SELECTIONS FROM THE GOVERNMENT RECORDS
IN THE ALIENATION OFFICE, POONA

# DECISIONS

FROM

## THE SHAHU & PESHWA DAFTAR

CONTAINING

( *WATAN-PATRAS, NIVA'D-PATRAS &c,* )

SELECTED BY

The Late Rao Bahadur Ganesh Chimnáji Vád, B. A.
Alienation Assistant to the Commissioner C D, Poona

AND EDITED BY

PURSHOTAM VISHRAM MAWJEE, J P, M R A S

AND

D. B. PARASNIS

PUBLISHED WITH THE PERMISSION OF THE GOVERNMENT OF BOMBAY.

BY

PURSHOTAM VISHRAM MAWJEE, J P., M. R. A. S.

1909



# Index.

# अनुक्रमणिका.



# वतनपत्रें, निवाडपत्रें,

## वगैरे.

---

### वतनपत्र १.

किता वतनपत्र शामजी गंगाधर व गोपाळ तुकदेव आडकुळे कुळकर्णी मौजे पाडळी तर्फ हवेली प्रांत सातारा छ ९ मोहरम सन इशिदे, बिल्हें वतनपत्र ऐसेजें:—तुम्हीं स्वामी-सनिध किले वंदनचे मुक्कामीं सन असरामध्यें हुजूर येऊन विनंती केली जे, मौजे मजकूरचें कुळकर्ण आपले पूर्वापार वडिलापासून वंशपरंपरा अनुभवीत आहों; त्यास जानो बाकदेऊ व गोपाळ गंगाधर वाल्दिबे हे आपल्या वतनास कथला करीत आहेत. सांप्रत गोपाळ गंगाधराचा लेक मोरो गोपाळ, राजश्री चंद्रसेन जाधवराऊ सेनापती याकडे चाकर आहे. व मौजे मजकूर मुकासा सेनापतीचे दिंमत आहे. त्याचे हिमायतीनें मौजे मजकुराच्या हिशेबा-बद्दल गोपाळ तुकदेऊ यास तलब करून नेऊन, बळेंच त्याचे पदरीं रुपये १५० दीडशें व गल्ला ।।।। पावणे साहा मण घालून, दबावून मौजे मजकूरचे कुळकर्णपैकीं तकसिमा दोनचा कागद लेहून घेतला आहे. परंतु मौजे मजकूरचे कुळकर्णास त्यास दखल होऊं दिल्हें नाहीं. आपलें कुळकर्ण आपण करीत असों. त्यांनीं जोरावारीनें कागद लिहून घेतला आहे. तरी स्वामींनीं त्यास हुजूर आणवून, त्याचा व आपला करिना मनास आणून तहकिकात केली पाहिजे, म्हणून विनंती केली. त्यावरून जानो बाकदेऊ व गोपाळ गंगाधर वाल्दिबे यांसी हुजूर आणविलें आणि राजश्री सखो विठ्ठल न्यायाधीश यांकडे मनसुफीस आज्ञा केली. तेहीं उभयतां वादी यासी जमान होऊन तकरिरा लेहून घेतल्या. शामजी गंगाधर आड-कुळे यानीं तकरीर लेहून दिल्ही ऐसीजें:—मौजे मजकूरचें कुळकर्ण वडील परंपरापासोन आपलें, दरम्यान पेशजी आदिलशाही पातशाही असतां, आगा रुजुवान दिवाण किले सातारी-यासी होते. त्यांपाशीं देवजीराम वाल्दिबे उभा राहोन, आपला आजा गोविंद नागनाथ आड-कुळा यासी तलब करून किले मजकुरीं नेलें. दिवाण मशारनिल्हेहीं देशमुख, देशपांडे प्रांत मजकूर व हमशाही गोत यांचे मतें दोघांचे करिने मनास आणून निश्चय केला जे, दोघे वादी कृष्णेंत घालावे; आणि बाबाजी पाटील मौजे मजकूर यानें क्रियापूर्वक आपले बेताळीस पूर्वज स्मरोन, कृष्णेंत रिघोन, जो पुरातन वतनदार खरा असेल तो हातीं धरून बाहेर आणावा. ऐसा तह करून दिवाण मशारनिल्हे व देशमुख, देशपांडे व हमशाही गोत मिळोन, माहुली संगमीं कृष्णातीरीं आले. दोघे वादी कृष्णेंत उभे केले, आणि समस्तांहीं पाटील मजकुरास शफतपूर्वक सांगितलें जे, तुम्हीं आपले बेताळीस पूर्वज स्मरोन, श्रीकृष्णा साक्ष

करून, जो पुरातन मौजे मजकूरचा वतनदार कुळकर्णी खरा असेल त्यास हातीं धरून घेऊन येणें, म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें क्रियापूर्वक पाटील मजकूर कृष्णेंत रिघोन, गोविंद नागनाथ आडकुळा ह्या मौजे मजकूरचा पुरातन वतनदार कुळकर्णी खरा, ऐसें कृष्णेमध्यें घालोन त्यास हातीं धरून बाहीर निघाला. समस्त गोतास ते क्रिया मान्य झाली. तेहीं गोविंद नागनाथ यासी पाटील मजकुराचे हातीं घेऊन आपले वतनावरी रवाना केलें. कुळकर्णाचा कार्यभाग पूर्वी करीतच होते, त्याही उपरी करीत गेले. ऐसें असतां मामुर्ती चौवर्षाउपरी, किल्ले मजकुरीं, आगा रुजुवान दिवाण यांजपाशीं फिरोन वाळिंबे मजकूर उभे राहून वाद सांगितला जे, श्रीकृष्णेची क्रिया केली त्यास आपण रजावंद नाहीं. मौजे मजकूरचे पांढरीवरी दिव्य नेमावें. दिव्यीं खरा होईल त्यानें वतन चालवावें. ऐसा वाद सांगून आपला आजा गोविंद नागनाथ यासी किल्ले मजकुरीं तलब करून नेविलें. तेथें दिवाणजीनें देशमुख, देशपांडे व हमशाही गोत मिळवून, बाळंभट वाळिंबे व गोविंद नागनाथ या दोघांस मौजे मजकूरचे पांढरीवरी नेऊन दिव्य करावें याबद्दल पाठविलें. तेथें समस्त गोत मिळोन हरदू जणा-कडवीं दिव्य करविलें. तेथें बाळंभट वाळिंबे यासी रव लागला. हा करीना दिवाणजीपाशीं समस्त गोत येहीं विदित केला. त्यावरून वाळिंबे खोटे ऐसें करून, आपले वडिलास पूर्वापार चालत आले प्रमाणें वतन चालवावयाची आज्ञा केली. मामुर्ती वाळिंबे विजापुरास जाऊन, मालुमातीचा फर्मान आपले वडील प्रसंगीं नसतां घेऊन आले. हें वर्तमान आपले वडिलांस कळलेनंतर लखोपंत विजापुरास जाऊन त्यानें मालुमाती फर्मान आणिला, तो बातील करून ताजा फर्मान घेऊन आले. वाळिंबे वतनास दखल नाहींत. आपले वडील सालाबादप्रमाणें चालवीत आहेत. त्याही उपरी महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामींस हा देश अर्जानी झाला. ते समयीं राजश्री दत्ताजीपंत वाकनिवीस यांचे स्वाधीन हा प्रांत होता. त्यापाशीं रामभट वाळिंबे जाऊन उभा राहिला, ऐसें वर्तमान आइकिलें. त्यावरून आपण राजश्री वाकनिवीसपंतापाशीं जाऊन भेटी घेतली. ते समयीं वाळिंबे तेथून गैरहाजीर जाहले. आपण आज्ञा घेऊन गांवास आलों. त्यावरी हा प्रांत राजश्री राघो बल्लाळ अत्रे याचे स्वाधीन जाहला. ते समयी त्यापाशीं जिवाजी विश्वनाथ व विठ्ठल गंगाधर वाळिंबे हयाळ होऊन, आपणास तलब करून, रहिमतपूरचे मुकामीं आपल्यास नेलें. तेथें पांच महालचे सुभेदार व देशमुख, देशपांडे हमशाही गोत लोक होते. त्यांचे मतें मौजे मजकूरचे मोकदम व बारा बलुते आपल्यापाशीं बोलावून आणिले, आणि आज्ञा केली जे, पुरातन कुळकर्णी वतनदार जो आहे तो परिछिन्न सांगणें म्हणून आज्ञा केली. त्यावरून मोकदम व बारा बलुते येहीं राजश्री राघो बल्लाळ व देशमुख, देशपांडे समस्त गोत यांसी बोलिले जे, वाळिंबीयासी कुळकर्णाचा आधिकार नाहीं. सालाबाद आडकुळे याचे मौजे मजकूरचें कुळकर्ण वतन खरें; म्हणून बोलिले. त्यावरून आपलें वतन चालवावयासी आपल्यास अभय देऊन गांवास पाठविलें. त्याउपरी राजश्री कृष्णाजी बाबाचे कारकिर्दीस राजश्री केसो

त्रिमल पन्हाळीयासी आले होते. त्यापाशीं जिवाजी विश्वनाथ वाळिंबा जाऊन उभा राहिला. हें वर्तमान आपल्यास कळलें, त्यावरून आपण पन्हाळ्यास गेलों. राजश्री प्रल्हादपंडित न्यायाधीश होते. त्यांस आद्यंत सकल वर्तमान विदित केलें. तेहीं भोगवटा व पूर्वील मौजे मजकूरचे पाटिलानें श्रीकृष्णेची क्रिया करून आपले कुळकर्णी सालाबाद आडकुळे खरे ऐसें झालें आहे. त्याउपरी दिर्व्यीही वाळिंबे खोटे जाहले, आडकुळे खरे; ऐसें पेशजीचें करीने परस्परें मनास आणून, आपणांस अभयपत्र दिधलें. जिवाजी विश्वनाथ वाळिंबा खोटा केला तो न पुसतां पळोन गेला. आपण अभयपत्र घेऊन गांवास येऊन सालाबादप्रमाणें कुळकर्ण चालवीतच आहों. त्याउपरी राजश्री कोनेरी रंगनाथ सरसुभेदार यांपाशीं जिवाजी विश्वनाथ व समस्त वाळिंबे उभे राहिले आणि आपणांस बोलावूं पाठविलें. आपण सरसुभेदार मशारनिल्हेपाशीं गेलों. तेहीं याच महालचे सुभेदार व देशमुख, देशपांडे व मोकदम व समस्त मिळून, उभयतां वादी उभे करून, पुरातन वतनदार कोण हे तहकिकात करणें, म्हणून समस्तांस आज्ञा केली. ते समयीं नाईकजी गाढवे देसाई प्रांत मजकूर यानीं समस्त समेदेखत साक्ष दिली जे, पाडळीचे कदीम वंशपरंपरा कुळकर्ण आडकुळे वतनदार खरे, ऐसें आपले वडील सांगत होते. वाळिंबे यांनीं मौजे मजकूर कुळकर्णी कोणे काळीं केलें नाहीं. वाळिंबीयासी पांढरीवरी घरठाण नांवणूक कदीम नाहीं. ऐसें वर्तमान आपले वडील सांगत आले आहेत. हे साक्ष समस्ता लोकीं मनास आणितां, दोनशां वर्षांची गोही केला. हलीं हा मजकूर समस्तांहीं चित्तास आणून वाळिंबे खोटे, आडकुळे पुरातन वतनदार खरे, ऐसें करून, त्यावरून आपल्यास अभय पत्र देऊन गांवास पाठविलें. सालाबादप्रमाणें वतन चालवीत आहों. त्यावरी महाराज राजश्री राजारामसाहेबांचे कारकिर्दीस राजश्री निळकंठ मोरेश्वर प्रधान साताराचे मुक्कामास आले. ते समयीं वाळिंबे त्यापाशीं हयाळ होऊन आपणास मसाला करून गडास नेलें. दोघांचा मुकाबला करावा तों वाळिंबे तेथें गैरहाजीर जाहले. आपण आज्ञा घेऊन गांवास आलों. त्याउपरी काळ कठीण पडला. योगक्षेम चालिला पाहिजे म्हणून मातुश्री व मुलें गांवीं ठेवून आपण उद्योगास गेलों. मागा (हून) राजश्री रामचंद्र पंडितापाशीं वाळिंबे जाऊन मातुश्रीस मसाला करून नेलें. चार महिने तेथें मातुश्रीस कष्टी केलें. आणि कामद लेहून घेतला जे, आपला लेक तीन महिन्यांत हजीर करावा म्हणून वायदा केला. आणि मातुश्रीस आज्ञा दिल्ही. आपण प्रवाशी दूर प्रांतीं होतों. तीन महिन्यांत आपलें येणें जाहलें नाहीं. याकरितां वाळिंबे राजश्री परशरामपंतापाशीं जाऊन, पांचशें रुपये कबूल करून देऊन, कुळकर्णास दुसाला पत्र घेतलें जे, गोतमुखें खरा होईलतों मौजे मजकूरचें कुळकर्ण वाळिंबीयांनीं आठ महिने चालविलें. त्यावरी चैत्रमासीं आपण गांवास आलों. मौजे मजकूरचे पाटील व देशकास रुजू झालों. तेहीं सांगितलें जे, वाळिंबे यांनीं दिवाणचा हुकूम आणिला, त्याप्रमाणें वर्तावें लागलें. तूं आपला करिना दिवाणास सांगून पत्र घेऊन येऊन आपलें कुळकर्ण करीत जाणें, म्हणून बोलिले. त्यावरी

आपण राजश्री आण्णाजी जनार्दन सुभेदार प्रांत मजकूर याकडे जाऊन वर्तमान विदित केलें. तेहीं मौजे मजकूरचे पाटील व देशमुख व शीवशाडे मेळवून तहकिकात करून आपणास हुमाल पत्र दिल्हें. तें गांवीं आणून वाळिंबीयासी दूर करून आपलें कुळकर्ण सालाबादप्रमाणें चालवीत आहों. सदरहू वतनाचे कागद इस्तकबीलपासून होते ते आपल्या घरास आगी लागली ते समयीं कुली दग्ध जाहले. ऐशी तकरीर जाहीर केली. याउपरी जानो थाकदेऊ व गोपाळ गंगाधर वाळिंबे या उभयतांनीं तकरीर लिहून दिल्ही जे, आपलें कुळकर्ण मौजे मजकूरचें पुरातन आहे. आडकुळे कुटुंबासहवर्तमान काळविशदें देश पडिला, ते समयीं फिरत फिरत मौजे मजकुरीं आले. आपले वडिलांनीं गांवांत घरठाण देऊन राहवलें. त्यावरी मौजे मजकूरचे पाटील दिवाण-कार्यप्रसंगीं विजापुरास जावयाचा निर्वाह केला. सांगाते कुळकर्णी पाहिजे, व मागें गांवींचाही मामला चालिला पाहिजे. आपले वडिलांपाशीं दुसरा आपले घरोबियांत शहाणा मनुष्य नव्हता. यास्तव आडकुळा मजकूर यासी कागदपत्र समजावून देऊन गांवीं कुळकर्णगिरीचें गुमस्तेपण ठेवून, आपण विजापुरास मौजे मजकूरच्या पाटलासमवेत गेला. तेथें कार्य प्रयोजन संमंधें तीन वरुषें लागलीं. त्यावरी गांवास आले. तंवरी आडकुळे गुमस्तगिरीचा कार्यभाग करीत असतां, पाटील व आपण एकदील होऊन आमच्या चहाडिया कित्येक सांगोन, मौजे मजकूरचे पाटील व आपले वडील यांमध्यें विक्षेप घालून, पाटीलास मेळवून घेऊन आडकुळे आपणासीं वाद सांगों लागले. याकरितां ते समयीं आदिलशाही पातशाही कारकिर्दीस आगा रुजुवान दिवाण किल्ले सातारीं होते, त्यापाशीं आपले वडिलांनीं करिना सांगितला. त्यावरून आडकुळीयासी तलब करून किल्ले मजकुरास आणिलें. ते समयीं दोघे वादीस श्री कृष्णेंत घालून मौजे मजकूरचे पाटील येहीं क्रियापूर्वक जो कदीम वतनदार त्यास हातीं धरावा ऐसा तह करून, समस्त गोत सहवर्तमान कृष्णातिरीं माहुलीसंगमीं आले. उभयतां वादी कृष्णेंत घालून पाटीलमजकूर यासी क्रियापूर्वक आज्ञा केली, त्याणें कृष्णेंत जाऊन आडकुळा हातीं धरून आणिला. आडकुळे याचा व पाटील मजकूर याचा एकदील पहिलेपासून सुल्लोख होता, त्याकरितां त्याची क्रिया आपले वडिलास मानली नाहीं. म्हणून मागती आगा रुजुवान दिवाण यापाशीं अर्ज केला जे, दोघे वादी संघातें घेऊन मौजे मजकूरचे पांडरीवरी देवापाशीं दिव्य करावें म्हणून. त्यावरून दिवाण मशारनिल्हे देशमुख, देशपांडे सहित मौजे मजकुरास आले. पांडरीवरी देवापाशीं दिव्य करविलें. त्यास दिव्यामध्यें आडकुळे यांनीं राळ घातली. तेणेंकरून आपले वडिलास दिव्य लागलें. ऐशी तकरीर लेहून दिल्ही. सदरहू दोघांच्या तकरीरा छ २५ रमजान सन इहिदे अशर मया अलफ किल्ले सातारचे मुक्कामीं मनास आणितां वाळिंबीयाचा भोगवटा पहिलेपासून झाला नाहीं. आदिलशाही कारकिर्दीमध्यें आगा रुजुवान दिवाण किल्ले सातारा येहीं आपण व देशमुख, देशपांडे समस्त गोतसहित माहुलीसंगमीं जाऊन

मौजे मजकूरच्या पादलास क्रियापूर्वक आज्ञा केली. त्यानें आपले वेतालीस स्मरोन कृष्णेंत रिघोन पुरातन वतनदार आडकुळे खरे, ऐसें बोलोन त्यास हातीं धरून बाहीर आणिलें. त्याही उपरी वाळिंबीयानें दिव्याचा करार केला. तेथेंही वाळिंबे दिव्यीं लागले, ते खोटे जाहले. आडकुळे कदीम वतनदार भोगवटा चालत आला आहे. ऐसें जाणवून तुह्मांस मौजे मजकूरचें कुळकर्णीचें वतन तुह्मांस वंशपरंपरेनें दुमाला केलें असे. सदरहू वतनास हक्क लवाजिमा इनाम सालाबाद चालत आलेप्रमाणें घेऊन वतन अनुभवीत जाणें. मोरो गोपाळ वाळिंबे यानें राजश्री चंद्रसेन जाधवराऊ सेनापती यांचे निसबत गोपाळ तुकदेऊ आडकुळे कुळकर्णी मौजे मजकूर यासी दबावून, त्याचे पदरीं रुपये वीडशें व गल्ला पावणे साहा मण घातला आणि मौजे मजकूरपैकीं कुळकर्ण दोन्ही तक्षीमा लिहून घेतले. तो कागद सदरहू नख्त व गल्ला तुजकडून त्यास देऊन, त्यानें कागद घेतला होता तो फिरावून देविला. व वाळिंबीयाचा वेवाचा कागद तुह्मांस लेहून देविला. वाळिंबे खोटे झाले याकारितां त्याचे माथां गुन्हेगारी रुपये ६०० सहाशें ठेवून हुजूर वसूल घेतला. तुमचें वतन कुळकर्ण मौजे मजकूरचें तुमचे दुमाला केलें ह्मणवून तुह्मांपासून शेरणी रुपये ३०० तीनशें हुजूर घेतले. त्याचा जाब अलाहिदा सादर होईल. तुह्मी मौजे मजकूरचें कुलकर्णीचें वतन सालाबाद चालवीत आलेप्रमाणें वंशपरंपरेनें अनभवून सुखरूप असणें, येविषयीं पत्रें:—

१ वतनपत्र.
१ सुभेदारास पत्र.
—
२

---

## वृत्तिपत्र २.

वेदमूर्ति प्रल्हाद जोशी बिन बापूजोशी व यादव जोशी बिन राम जोशी मांडके जोशी ग्रामउपाध्ये कसबे शिरवळ यासी दिल्हें वृत्तिपत्र ऐसीजें:— रामभट बिन त्रिंबकभट, गोपाळभट बिन केशवभट वाळिंबे उपाध्ये निसबत देशपांडे, परगणे शिरवळ, याचा कसबे मजकूरचे ब्राह्मणांचे घरींच्या ग्रामउपाध्येपणाचा (धंदा) होता. याबद्दल हरदूवादे सन खमसामध्यें भांडत हुजूर आले. त्यावरून मनास आणितां, पूर्वीं कसबे मजकुरीं रंभाजी निंबाळकराचे कारकिर्दींत शके १६३१ हेमलंबीनाम संवत्सरीं, देशमुख व देशपांडे यांनीं दोघांपासुन जामीन व कतबे घेऊन, चिरपत्रें देऊन कसबे फलटणास गोतांत पाठविलें. त्यास गोताची निशा वाळिंबे याजवळ कागदपत्रें होतीं, त्यावरून निशा नव्हे. तेव्हां गोतानें, त्यानें कसबे मजकुरास पत्रें पाठवून सडी आणवून सडीप्रमाणें निवाडपत्र करून गोतानीं जोशी यास दिल्हें कीं, मांडके जोशी ग्रामउपाध्ये खरे; वाळिंबे, देशपांडे याचे घरचे उपाध्ये. यास ब्राह्मणांचे घरींचे उपाध्येपणास संमंध नाहीं. ऐशी पत्रें जोशी यास दिल्हीं. त्यावरी वाळिंबे

निवाडपत्राप्रमाणें वर्तणूक न करीत. कथला करूं लागले. याकरितां मांडके जोशी शके १६४१ विकारीनाम संवत्सरांत हुजूर येऊन जाहीर केलें. त्यावरून वाळिंबे यांस तलब करून आणिलें आणि हरदु यास श्री महाबळेश्वरास गोतांत पाठविलें. तेथें हरदुजणांनीं राजिनामे नेमोचरें लेहून दिल्हें. आणि वाळिंबे गैरहजीर जाहले. याकरितां पांच वर्षें मनसुबी राहिली. त्याउपरी शके १६४६ क्रोधीनाम संवत्सरें, कार्तिक मासीं, प्रल्हाद व यादव-जोशी मांडके व रामभट व गोपाळभट वाळिंबे हे हरदुजण वादें भांडत हुजूर आले. ते समयीं कुल परगणे मजकूरचें गोत, देशपांडे परगणे मजकूर यांचे मनसुफीबद्दल हुजूर आणिलें होतें. त्यांचे मतें निर्वाद झाला कीं, वाळिंबे फलटणच्या गोताच्या इनसाफास राजी नाहींत. यास दिव्य नेमून यावें ऐसें जाहलें. त्यावरून हरदुजणांस पुरशीस करितां वाळिंबे बोलिले जें, आपली साक्ष गोत देत नाहीं व आपण फलटणच्या निवाडियास राजी नाहीं. आपले वडिलीं पूर्वी जोशी यासी श्रीकेदारेश्वरीं दिव्य केलें आहे. हलीं जोशी यांनीं श्रीकृष्णेचें दिव्य करावें. आपण राजी आहों. ह्मणोन हरदुजणांनीं राजिनामे व कतबे लेहून देऊन दिव्यास राजी झाले. त्यावरून शके १६४६ क्रोधीनाम संवत्सरीं, कार्तिक बहुल अष्टमी बुधवारीं बरोबर भिकाजी कृष्ण चिटणीस सुभे मजकूर यासी देऊन माहुली संगमास श्रीकृष्णेस हरदुजणास पाठविलें. तेथें जाऊन प्रल्हाद जोशी याणीं स्नान करून, मस्तकीं शिरोपत्र बांधून हातीं जल घेऊन बोलिले कीं, आपण कसबे मजकुरीचे काळे पांढरीचे मांडके जोशी, ग्रामउपाध्ये, पुरातन वतनदार खरे; आणि वाळिंबे, देशपांडे यांचे उपाध्ये ऐसें बोलोन गोपाळभट वाळिंबे याचे हातावर जल त्रिवार घातलें. त्यासी दशरात्रीची मुदत केली. दशरात्रीमध्यें जोशी यास क्रिया लागली नाहीं. त्यावरून जोशी खरे झाले. वाळिंबे खोटे झाले. त्यावरून राजश्री नारो पंडित सचीव यांनीं जिल्हेचीं पत्रें व खालशाचीं पत्रें करून दिल्हीं. आणि वाळिंबे मागती दुराग्रहास प्रवर्तोन श्रीकृष्णातीरीं उपवास करीत बसले. त्यावरून समस्त सरकारकून यांनीं स्वामींस विनंती केली कीं, वाळिंबे ब्राह्मण कृष्णातीरीं उपवास करितात. आणि अग्निदिव्य करूं ह्मणतात. त्यासी बोलावून आणून अग्निदिव्य नेमून देविलें पाहिजे. त्यावरून पंत-सचीव व राजश्री पंताजी शिवदेव यास आज्ञा केली. त्यावरून मशारनिल्हेनीं हरदुजणास बोलावून राजिनामे जमानकतबे हरदुजणाचे घेऊन, श्री केदारेश्वरीं कसबे मजकूर येथें वाळिंबे यासी अग्निदिव्य नेमून दिल्हें. बरोबर महादाजी नारायण सभासद दिंमत सचीव यांस देऊन कसबे मजकुरीं पाठविलें. तेथें जाऊन राजश्री शामजी हरी नामजाद प्रांत मावळे व राजश्री रामाजी यादव दिंमत खालसा देशमुख व देशपांडे कसबे मजकूरीं मिळून वाईकर राममट हुशींग व नारायणभट हुशींग यांचे विद्यमानें मार्गशीर्ष शुद्ध पंचमी रविवारीं दिव्य करार केलें. त्यास दिव्य समयीं रविपात्रांतील तेल तुपास अग्नि लागला आणि जळोन गेले. ते दिवशीं दिव्य राहिलें. त्या उपरी

दिव्यास दुसरा मुहूर्त समस्तांचे विचारें शके १६४७ विश्वावसुनाम संवत्सरे, मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीस सोमवारीं निश्चय केला. त्यावरून दोघे वादी यांनी राजिनामे लेहून दिल्हें. ते दिवशी यथाविधि शास्त्र पाहून, तूप तेल वजन रुपये सत्तरभार घालून सत्व करून रवीपात्र सिद्ध केलें. गोपाळभट वाळिंबे याजकडून शिस्त (?) करून मस्तकीं शिरोवस्त्र बांधिलें कीं, माडके जोशी याजपूर्वी आपल्या वडिलीं ब्राह्मणाचें घरचें ग्रामउपाध्येपण खादलें. जोशी यास गणेश घटिका या वेमळे ब्राह्मणाचे घरी प्रयोजन कांहीं नाहीं. ह्मणून पूर्वी आपले वडिलीं दिव्य केलें आहे. हल्लीं आपण दिव्य करितों. ऐसें श्रीपत्र बांधोन गोपाळभट बोलिले कीं, पत्री अर्थ आहे, तो यथार्थ आहे. ऐसें बोलोन रवा काढिला. त्याउपरी दुसरे दिवशीं समस्त समानाईक व देशक परगणे मजकूर यांनी लखोटा फोडून गोपाळभटाचा हात पाहिला, तो हाताच्या पांच बोटांस पांच फोड आले. हे पाहून हातास खलित्या घालून लखोटे करून शामजी हरी सुभेदार व रामाजी यादव फौजदार व देशमुख व देशपांडे यांनी खबरा लिहून, हुजूर स्वामींकडे मौजे धोम, परगणे वाई तेथील मुक्कामास पाठविले. तेथें राजश्री स्वामींनी श्री नरसिंह सन्निध कृष्णातीरीं सरकारकुनाच्या विद्यमानें गोपाळभटाच्या हातास फोड आले हे पाहून, समस्तांचे मतें वाळिंबे खोटे जाहले. माडके जोशी खरे जाहले. त्यास स्वामींनी वस्त्र दिल्हे आणि वाळिंबे याजकडून जोशीयास येजीतखत लेहून देविलें बदस्तूर रामभट वाळिंबे कीं, आपण गोतमुखें श्रीकृष्णेचे क्रियेमुळे श्रीकेदारेश्वरी रवा आपण काढिला, त्यामुळे आपण खोटे झालो, व आपणास ब्राह्मणाच्या घरचे ग्रामउपाध्येपणास संबंध नाहीं. आपणाकडे जोशी याचे वाढे देन्हीं होते ते जोशी याच्या स्वाधीन केले असत. म्हणोन येजीतखत लेहून दिल्हे. माडके जोशी कसबे मजकूरचे ग्रामउपाध्ये वतनदार जाणोन, जोशी मशारनिल्हेच्या ज्योतिष व ग्रामउपाध्येपण व धर्माधिकारीपण तुमच्या हुमाला केले असे. वाळिंबे याजजवळ मालमातीचे कागद असतील ते रद्द असत. जोशी यास वतनसमर्थे शेरणी रुपये १५० दीडशे हुतर्फा जिल्हेकडे व खालसाकडे वसूल जाहला असे. वाळिंबे खोटे जाहले त्यापासून गुन्हेगारी रुपये ३०० तीनशें घेतले असेत. पत्रे माघ शुद्ध चतुर्थी बार छ ११ रजब सन सीत अशरीन मया. म्हणून पत्रें:—

१ वृत्तिपत्र.
१ राजश्री शामजी हरी सुभेदार प्रांत मावळ.
१ राजश्री रामाजी यादव दिमत खालसा.
१ देशमुख व देशपांडे, परगणे शिरवळ.
४

## वृत्तिपत्र ३.

बार कीर्द छ १९ रमजान सन समान सलासीन मया व अलफ. स्वामी यानीं अमृतराव बिन खंडोजी इबिन बाळाजी नाईक खोपडे देशमुख तर्फ उत्रोली तपे रोहीडखोरें यास दिल्हें वृत्तिपत्र ऐसीजे, तुम्हीं हुजूर कसबे उंजजेच्या मुकामास येऊन विदित केलें जे, तर्फ मजकूरचे देह २० वीस येथील देशमुखीचें वतन देखील भाऊबंद आपलें आहे. व शिक्के २ दोन पूर्वीपासोन चालत आहेत. त्यास आपण निमेचे भाऊ, आपणाकडे निमे दस्ताचे देह ९॥ साडेनव देखील इसाफत मौजे नाझरें व एक शिक्का आहे. व निमेचे भाऊ नरसिंगराव बिन बिंबाजी नाईक खोपडे याजकडे निमेच्या दस्ताचे देह १०॥ साडे दाहा देखील इसाफत मौजे आंबाडे व एक शिक्का आहे. याप्रमाणें दोन्ही वाटे व दोन शिक्के चालतात. त्यास आपले बाप खंडोजी नाईक यास स्त्रिया पांच ५ होत्या. त्यांपैकीं दोघींचा वंश आहे. त्यास वडील पुत्र बापाचे आपण, उदावा धाकटीचे पोटीचे, व धाकटे बाळाजी नाईक वडील जैनाबाचे पोटीचे, येणेंप्रमाणें दोघीजणींस दोघे झालों. त्यास आपले बाप मृत्यु पावलीयावरी त्याजमागें आपण वडील पुत्र शिक्का आपलीयाकडे असावा. ऐसें असतां धाकटे बाळाजी नाईक याजकडे शिक्का आहे. सबब जे वडील बायकोचे पुत्र ह्मणून बळास आले आहेत. तरी वडील आपण आहों. धर्मतः न्यायें मनास आणून आपला शिक्का आपलियाकडे देविला पाहिजे. ह्मणून विनंति केली. हें वर्तमान बाळाजी नाईक यानीं ऐकोन हुजूर आले. त्यानीं आपला करिना विदित केला कीं, आपल्या बापास स्त्रिया ५ पांच होत्या. त्यांपैकीं वडील स्त्री जैनाबा, तिचे पोटीचे आपण बापाचे धाकटे पुत्र. व धाकटी स्त्री उदावा तिचे पोटीचे अमृतराव बापाचे वडील पुत्र, याप्रमाणें दोघींचा वंश आहे. त्यास आपण वडील स्त्रियेचे पुत्र ह्मणून बापा माघारें पांचांनीं आपल्या स्वाधीन शिक्का केला. त्यावरून आपण शिक्का करीत आहों. त्यास महालीं अमृतराव यानीं कजिया शिक्क्याचा आपल्याशीं केला. तेव्हां रामोजी नाईक खोपडे व कृष्णाजी नाईक व बाघोजी नाईक खोपडे यानीं आह्मां दोघांची समजाविशी केली कीं, शिक्क्याचें उत्पन्न निमे-निम दोघांनीं घ्यावें. शिक्का आपण करावा. नांवें दोघांचीं ल्याहावीं. ऐसी समजाविशी करून आपला कागद त्याकडे व त्यांचा कागद आह्मांकडे देऊन समजाविशी केली आहे. ह्मणून करिना. त्यावरून राजश्री चिमणाजी पंडित सचीव यांस आज्ञा केली कीं, यांच्या तकरिरा व कतबे जिल्हेकडे घेणें. त्यावरून सदरहूप्रमाणें तुह्मीं व बाळाजी नाईक यानीं तकरिरा व कतबे दिल्हे. मग तुह्मां हरदोजणांस आज्ञा केली कीं, तुह्मीं बापाचे पुत्र दोघे; त्यास बायकोच्या वडील-धाकुटपणामुळें कजिया करितां. तरी ये गोष्टीचा निर्णय धर्मशास्त्रीं जो असेल त्याप्रमाणें वर्तावें. ये गोष्टीस राजी होणें असेल तरी राजी होऊन राजिनामे व वर्तावयाचें जामीन देणें. तेव्हां तुह्मीं व बाळाजी नाईक धर्मशास्त्रांतल्या निश्चयास राजी होऊन, राजिनामे दिल्हे व वर्तावयाचे जामीन तुम्हीं जानोजी मोहिटे मोकदम मौजे हिंगणगांव परगणे फलटण यांस दिल्हे व

बाळाजी नाईक यानीं जमान कृसाजी पाटील काळभर कसबे पाल तर्फ उंब्रज प्रांत कऱ्हाड यांस दिल्हें. त्यावरी राजश्री फत्तेसिंग भोसले यांजकडे मनसुफी दिल्ही. तुम्हां हरदो जणांस आज्ञा केली कीं, मशारनिल्हेकडे जाऊन निर्वाह करून घेणें. तेव्हां तुह्मीं हरदो जण त्याकडे गेलेस. निर्वाह करितात. मशारनिल्हेनीं आपले सदरेस सभा केली. तितपशील नांवनिशीः—

१ राजश्री रावजी उपाध्ये.
१ राजश्री पंतप्रधान यांकडील भिकाजी परभू.
१ राजश्री दौलतराव शिर्के.
१ राजश्री पंतसचीव यांकडील राजश्री बाजी बावजी.

गोत महालानिहाय हजीर.

२ सुभानजी नाईक बांवल देशमुख तर्फ हिरडस मावळ.१ बापुजी नाईक व धनाजी नाईक कोंडे देशमुख तर्फ खेडेबारें.
संताजी बिन कान्होजीराव पासलकर देशमुख तर्फ मोसें खोरें.१

१ राजश्री नारोराम मंत्री.
१ राजश्री भास्कर वैद्य.
१ राजश्री यशवंतराव महादेव कारकून दिंमत मशारनिल्हे.
___
३
१ राजश्री रामाजी दामोदर दिवाण.
१ राजश्री पांडुरंग खंडेराव.
१ राजश्री बापुराव शामराज फडणीस.
___
३
१ हजीर मज्यालशी समस्त.

येणेंप्रमाणें सभास्थानीं सभानायक व गोत बैसोन, तुम्हां दोघांच्या तकरिरा मनास आणिल्या. त्यास तुह्मांस पुरशीस केली कीं, तुमचा शिक्का कैसा ? तेव्हां तुह्मीं सदरहू प्रमाणें करिना विदित केला. मग बाळाजी नाईक यांस पुरशीस केली कीं, तुह्मीं आपला शिक्का कैसियावरून ह्मणतां ? त्यास त्यांनीं तकरीर केली कीं, आपण वडील बायकोचा पुत्र, यामुळें आपण वडील; व पांचांनींही शिक्का आपल्या गळां घातला आहे. व यांच, आमचा कजियाही भावांनीं चुकवून समजाविशी करून, कागद परस्परें दोघांकडे आहेत ते मनास आणावे; शिक्का आपला आहे; ऐसें बोलिले. यावरी तुह्मांस पुरशीस केली कीं, बाळाजी नाईक ह्मणतात याचा करिना काय आहे? तेव्हां तुह्मीं तकरीर केली कीं, आपण बापाचा वडील पुत्र धाकटे बायकोचे पोटींचा, आणि बाळाजी नाईक मज धाकटे, परंतु थोरले स्त्रियेचे पोटींचा; याचा सिद्धांत जो शास्त्रमतें होईल त्यास राजी आहे. व पांचांनीं शिक्का बाळाजी नाईक यांस दिल्हा ह्मणून बाळाजी नाईक ह्मणतात. तरी आपले बाप मेले, त्यांचें उत्तरकार्य आपण करून लष्करास गेलों; यामुळें दोन वर्षें राहणें झालें. मागें महालाचा कारभार चालिला पाहिजे, आणि आपण तों हुजूर नाहीं. ह्मणून शिक्का कारभाराकरितां पांचांनीं बाळाजी नाईक याचे हवाला केला. नेहमीं दिल्हा

ऐसें नाही. लष्करातून आपण आलो. आपला शिक्का आपले स्वाधीन करावा, ते करितनात. ह्मणून कजिया झाला त्यास रामोजी नाईक व कृष्णाजी नाईक व वाघोजी नाईक खोपडे भाऊ मिळाले, आणि समजाविशी करितो म्हणून आह्मा दोघास नेले. सत्य करितो ह्मणून बोलिले, आणि शास्त्रप्रमाणे निर्वाह न करिता, बेजमा हल्ली समजाविशी काढिली की, शिक्का बाळाजी नाईक याजकडे यावा. कागदी नावे दोघाची ल्याहावी. शिक्याचे उत्पन्न निमें निमे घ्यावे.| ऐसा बाळाजी नाईक याचा प्रतिपक्ष करून त्याचा कागद आम्हांस, व आमचा कागद त्यास देविला. त्यास कागद लिहिले ते काही नारो शकर गाडेकर देश कुळकर्णी तर्फ मजकूर याचे दस्तुरे अगर त्याच्या मुतालीकाच्या दस्तुरे ल्याहावे, ते लिहिविले नाहीत घरात बाहिरो शिवदेऊ सोनटक्का याजकडून कागद त्यानी लिहिविला, आणि दोघास दिल्हे. करिता आपणास फळलीयावरी आपण राजी नाही म्हणून बोलोन गेलो. तेव्हा सदरहू भावानी राजश्री नारो पंडित सचीव यास समजाविशीचें वर्तमान विदित केले. त्यानी उत्तर दिल्हे जे, वडील असता शिक्का धाकटीयाकडे कैसा द्यावासा केला आणि वाटणी केली, हें केले कर्म उत्तम झाले नाही कागद कार्याचे नाही. तेथून दोघाकडेही केल्या कार्याचा भोगवटा चालिला नाही यावरी आपण हुजूर आलो; त्याची समजाविशी त्याचा पक्ष धरून केली यास आपण कबूल नाही ऐसे बोलिलेस त्यास पाचा जणानी शिक्का दिल्हा ते कोणी ह्मणून बाळाजी नाईक यास पुसिले तेव्हा त्यानी सांगितले की, राणोजी नाईक बादल देशमुख तर्फ हिरडस मावळ व नागोजी सर्य्याराव जेधे देशमुख तर्फ भोर वगैरे याचे गुजारतीने पाचानी शिक्का दिल्हा. त्यास दोघाजणास पुरशीस आणवावें ऐसा सिद्धात झाला. तेव्हा तुम्ही सांगितले की दोघानीही लेहून पाठविले की, शिक्का नेहमी दिल्हा नाही, कारभार चालवावयाकरिता अमृतराव हजीर नव्हते म्हणून दिल्हा आहे, ऐसे लिहिले राजश्री पत सचीव याजकडे आहे ते मनास आणिता, सदरहू प्रमाणे लिहिलें आहे. त्यावरून नेहमी शिक्का दिल्हा नाही, ऐसे खरे जाहले व रामोजी नाईक व कृष्णाजी नाईक व वाघोजी नाईक खोपडे यानी समजाविशी केली ते कागद मनास आणिता, न्यायशुद्ध केला नाही देशमुखीच्या कज्याचा कागद परस्परे दोघास लेहून देणे तो देशकुळकर्णी यानीं ल्याहावा, ते न करिता, घरचे घरात बाहिरो शिवदेऊ याजकडून लिहिविला. तो कार्याचा नाही. बाळाजी नाईक याच्या प्रतिपक्षाची समजाविशी केली ऐसे सभानायकास व गोतास दिसून आले. त्यावरून ते समजाविशी दूर केली. कागद बातल केले. मग समस्त सभानायक यानी श्री विज्ञानेश्वर धर्मशास्त्रार्थ मनास आणिला. तेथे निर्णय की, बापाच्या पुत्राचा अनुक्रमाप्रमाणे वडील धाकुटपणाचा निश्चय खरा, स्त्रियाच्या अनुक्रमावरी पुत्राचा अनुक्रम नाही. ऐसा निश्चय जाणून तुह्मी बापाने वडील पुत्र, शिक्क्याचे अधिकारी ऐसे खरे करून, मशारनिल्हेनीं समस्ता देखत तुम्हास व बाळाजी नाईक यास सांगितले की, वडील अमृतराव, धाकटे बाळाजी नाईक याप्रमाणे

निर्वाह खरा झाला. हे वर्तमान झाल्या निर्वाहाचे पंडित मशारनिल्हेनी तुह्मास व बाळाजी नाईक यास हुजूर आणून, दोघा देखत विदित केलें तें मनास आणिता, यथान्याये निर्वाह झाला ऐसे जाणून, बाळाजी नाईक तुम्हा धाकटा असता, शिक्का त्याकडे होता तो दूर करून, तुह्मीं वडील, शिक्का तुमचा तुम्हाकडे असावा हा निश्चय खरा जाणून, तुमचा तुमचे हुमाला केला असे. बाळाजी नाईक यास याउपर शिक्क्यासी कजिया करावयासी अर्था-अर्थी संबंध नाहीं. या कजियाचे कागदपत्र बाळाजी नाईक या पाशी असतील ते रद्द असत. तरी तुम्ही बापाचे वडील पुत्र खरे, कारभार तपे मजकूरचा व शिक्का वंशपरंपरेनें अनुभवणे. तुमचे निमे वाटणीचे देह दस्ताप्रमाणे ९॥ साडेनव आहेत, त्याचे वाटे तुम्ही व भावानी केले ५ पाच, पैकी शिक्क्याकडे वाटा १ एक, बाकी वाटे च्यार, पैकी भावाकडे वाटे तीन, बाकी वाटा १ एक तुमच्या बापाचा आहे. त्यापैकी निमे तुम्ही व निमे बाळाजी नाईक यानी भाऊपणाचा वाटा अनुभवून असावे. व तुम्ही भाऊपणाचा वाटा निमे घेणे व शिक्क्याचा वाटा एक व कारभार शिक्क्याचे उत्पन्न व इसाफतीचा रावता महार व पट्टी पासोडी व मुळवे चाकर लोक शिक्क्याकडे पेशजीप्रमाणें चालत आहेत, याप्रमाणें शिक्क्याचें तुमचे तुम्ही अनुभवणें सदरहू शिक्क्याच्या उत्पन्नासी दुसरीयासी संबंध नाहीं. या वतन समंधे तुमचे माथा जीवनमारफीक शरेणी हुतर्फा करार केले रुपये १००० एक हजारास सदरहूची उगवणी जिल्हेकडे करून, तर्फ मजकूरचा शिक्क्याचा उपभोग घेऊन सुखरूप असणे. एकूण पत्रे सुरुसन समान सलासीन मया आलफ. पिंगल (नाम) संवत्सरे पत्रे सुमारः—

१ वतनपत्र मशारनिल्हेच्या नावे.
१ देशपांडे व मोकदमानि देहाय तर्फ उनोली.
१ देशाधिकारी.
१ राजश्री त्रिमणाजी पंडित सचीव.
—
४

एकूण चार पत्रे देणे

---

### अभयपत्र ४

अभयपत्र राजश्री मोकदमानी मौजे महागाव समत निंब प्रांत वाई ताहा विठोजी बिन आप्पाजी गुरव मौजे मजकूर सुरुसन समान सलासीन मया व आलफ लिहून दिल्हे अभयपत्र ऐसीजे, तुझे वडील हजरत अवरंगजेब उत्पती आविधीचा शहाजादा याचा राज्यक्रांत जाहला तेव्हा गाव देश उध्वस्त जाहला. तेव्हा तुह्मी घगातीरी गेला. ते तुह्मी श्री राजा शिवछत्रपती देशास आले तेव्हा मुलुख सर्व भरिला उपरांतिक तुह्मी देशास येऊन आपले गावावरी आला. तेथून हणमोजी गुरव हा मुजाहत पडला. ह्मणून छत्रपतींनी इनाम बिघे ८३ ती त्यासी वायको निरा ईस दिल्हे त्याजवरी तिंब व शिदोजी बिन

ऐसें नाहीं. लष्करांतून आपण आलों. आपला शिक्का आपले स्वाधीन करावा, ते करिनात. ह्मणून कजिया झाला. त्यास रामोजी नाईक व कृष्णाजी नाईक व बाघोजी नाईक खोपडे भाऊ मिळाले, आणि समजाविशी करितों म्हणून आह्मां दोघांस नेलें. सत्य करितों ह्मणून बोलिले, आणि शास्त्रप्रमाणें निर्वाह न करितां, बेजमा हल्लीं समजाविशी काढिली कीं, शिक्का बाळाजी नाईक यांजकडे द्यावा. कागदीं नांवें दोघांचीं ल्याहावीं. शिक्याचें उत्पन्न निमें निमें घ्यावें. ऐसा बाळाजी नाईक यांचा प्रतिपक्ष करून त्याचा कागद आम्हांस, व आमचा कागद त्यांस देविला. त्यास कागद लिहिले ते कांहीं नारो शंकर गांडेकर देश कुळकर्णी तर्फ मजकूर यांचे दस्तुरें अगर त्यांच्या मुतालीकाच्या दस्तुरें ल्याहावे, ते लिहिविले नाहींत. घरांत बहिरो शिवदेऊ सोनटक्का याजकडून कागद त्यांनीं लिहिविला, आणि दोघांस दिल्हे. करिना आपणास कळलीयावरी आपण राजी नाहीं म्हणून बोलोन गेलों. तेव्हां सदरहू भावांनीं राजश्री नारो पंडित सचीव यांस समजाविशीचें वर्तमान विदित केलें. त्यांनीं उत्तर दिल्हें जे, वडील असतां शिक्का धाकटीयाकडे कैसा द्यावासा केला आणि वांटणी केली, हें केलें कर्म उत्तम झालें नाहीं. कागद कार्याचे नाहीं. तेथून दोघांकडेही केल्या कार्याचा भोगवटा चालिला नाहीं. यावरी आपण हुजूर आलों; त्याची समजाविशी त्यांचा पक्ष धरून केली. यास आपण कबूल नाहीं ऐसें बोलिलेस. त्यास पांचा जणांनीं शिक्का दिल्हा ते कोणी ह्मणून बाळाजी नाईक यास पुसिलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, राणोजी नाईक बांदल देशमुख तर्फ हिरडस मावळ व नागोजी सर्ज्याराव जेधे देशमुख तर्फ गोर वगैरे यांचे गुजारतीनें पांचांनीं शिक्का दिल्हा. त्यास दोघाजणांस पुरशीस आणवावें ऐसा सिद्धांत झाला. तेव्हां तुम्हीं सांगितलें कीं दोघांनींही लेहून पाठविलें कीं, शिक्का नेहमीं दिल्हा नाहीं; कारभार चालवावयाकरितां अमृतराव हजीर नव्हते म्हणून दिल्हा आहे, ऐसें लिहिलें. राजश्री पंत सचीव यांजकडे आहे तें मनास आणितां, सदरहू प्रमाणें लिहिलें आहे. त्यावरून नेहमीं शिक्का दिल्हा नाहीं, ऐसें खरें जाहलें. व रामोजी नाईक व कृष्णाजी नाईक व बाघोजी नाईक खोपडे यांनीं समजाविशी केली ते कागद मनास आणितां, न्यायशुद्ध केला नाहीं. देशमुखीच्या कज्याचा कागद परस्परें दोघांस लेहून देणें तो देशकुळकर्णी यांनीं ल्याहावा, तें न करितां, परचे घरांत बहिरो शिवदेऊ यांजकडून लिहिविला. तो कार्याचा नाहीं. बाळाजी नाईक यांच्या प्रतिपक्षाची समजाविशी केली ऐसें सभानायकांस व गोतास दिसून आलें. त्यावरून ते समजाविशी दूर केली. कागद बातल केले. मग समस्त सभानायक यांनीं श्री विज्ञानेश्वर धर्मशास्त्रार्थ मनास आणिला. तेथें निर्णय कीं, बापाच्या पुत्राचा अनुक्रमप्रमाणें वडील धाकुटपणाचा निश्चय खरा; स्त्रियांच्या अनुक्रमावरी पुत्राचा अनुक्रम नाहीं. ऐसा निश्चय जाणून मुलीं बापाचे वडील पुत्र, शिक्क्याचे अधिकारी ऐसें खरें करून, मशारनिल्हेनीं समस्तां देखत तुम्हांस व बाळाजी नाईक यांस सांगितलें कीं, वडील अमृतराव, धाकटे बाळाजी नाईक याप्रमाणें

निर्वाह खरा झाला. हे वर्तमान झाल्या निर्वाहाचे पडित मशारनिल्हेनी तुह्मास व बाळाजी नाईक यास हुजूर आणून, दोघा देखत विदित केले. ते मनास आणिता, यथान्यायें निर्वाह झाला ऐसे जाणून, बाळाजी नाईक तुम्हा धाकटा असता, शिका त्याकडे होता तो दूर करून, तुह्मीं वडील, शिका तुमचा तुम्हाकडे असावा हा निश्चय खरा जाणून, तुमचा तुमचे हुमाला केला असे. बाळाजी नाईक यास याउपर शिक्यासी कजिया करावयासी अर्थाअर्थी संबध नाही. या कजियाचे कागदपत्र बाळाजी नाईक या पाशी असतील ते रद्द असत. तरी तुम्ही बापाचे वडील पुत्र खरे, कारभार तर्फ मजकूरचा व शिक्का वशपरपरेनें अनुभवणे. तुमचे निमे वांटणीचे देह दस्ताप्रमाणे ९॥ साडेनव आहेत, त्याचे वाटे तुम्ही व भावानीं केले ५ पाच, पैकी शिकयाकडे वाटा १ एक, बाकी वाटे च्यार, पैकी भावाकडे वाटे तीन, बाकी वाटा १ एक तुमच्या बापाचा आहे. त्यापैकी निमे तुम्ही व निमे बाळाजी नाईक यानी भाऊपणाचा वाटा अनुभवून असावे. व तुम्ही भाऊपणाचा वाटा निमे घेणे व शिक्याचा वाटा एक व कारभार शिक्याचे उत्पन्न व इसाफतीचा रावता महार व पट्टी पासोडी व मुळवे चाकर लोक शिकयाकडे पेशजीप्रमाणे चालत आहेत, याप्रमाणे शिक्याचे तुमचे तुम्ही अनुभवणे. सदरहू शिक्याच्या उत्पन्नासी दुसरीयासी संबध नाही. या वतन समधे तुमचे माथा जीवनमाफीक शरेणी दुतर्फा करार केले रुपये १००० एक हजारास सदरहूची उगवणी जिल्हेकडे करून, तर्फ मजकूरचा शिक्याचा उपभोग घेऊन सुखरूप असणे. एकूण पत्रे सुरुसन समान सलासीन मया आलफ. पिंगल (नाम) संवत्सरे पत्रे सुमार:—

१ वतनपत्र मशारनिल्हेच्या नावे.
१ देशपांडे व मोकदमानि वेहाय तर्फ उंब्रोली.
१ देशाधिकारी.
१ राजश्री चिमणाजी पडित सचिव.
४

एकूण चार पत्रे देणे.

---

### अभयपत्र ४.

अभयपत्र राजश्री मोकदमानी मौजे महाप्राव समत निंब प्रांत वाई ताहा विठोजी बिन आप्पाजी गुरव मौजे मजकूर सुरुसन समान सलासीन मया व आलफ. लेहून दिल्हे अभयपत्र ऐसीजे, तुझे वडील हजरत अवरगजेब उत्पती आविधीचा शाहाजादा याचा राज्यक्रांत जाहला तेव्हा गाव देश उध्वस्त जाहला. तेव्हा तुम्ही गगातीरी गेला. ते तुम्ही श्री राजा शिवछत्रपती देशास आले तेव्हा मुलुख सर्व भरिला. उपरातिक तुह्मीं देशास येऊन आपले मामावरी आला. तेथून हणमोजी गुरव हा गुजात पडला. ह्मणून छत्रपतीनी इनाम बिघे ८३ ती त्याची बायको निरा ईस दिल्हे. त्याजवरी निंब व शिरोजी बिन

बयाजी·गुरव·याचें बनेनासें जाहलें. तेव्हां ती येऊन तुम्हांपाशीं राहिली. तिचा प्रतिपाळ करून तिचा अंतकाळ तुजपाशीं जाहला. तेव्हां तिची जमीन व तिच्या घरांतील चीजवस्त होती ती तुजकडे सरकारांतून जाहली. शिदोजीस अर्थाअर्थी बोलावयासी संबंध नाहीं. ऐसें हुजूरून महाराजापासून व श्रीमंत रावपंत प्रतिनिधी व पंतप्रधान यांजपासून जाहलें. तेव्हां त्याची बायको अना इनें तुम्हांस विष घालून तुझीं तिंघे पोरें मारिलीं. तुझे बायकोस व तुजलाही घातलें. तेव्हां तुम्हीं जाऊन मौजे कठापूर संमत कोरेगांव येथील वैद्य मांग संभनाक होता, तो आणिला. याउपरी उपाय करावा तों त्यास अडथळ्यास शिदोजी आला. मग तुंवा अजम शेखजीसाहेबांपासून मांग वैद्य नेमून घेऊन बरोबर दावलशा व राजजी बागुल आगु त्याच्या विद्यमानें वीख पाडिलें. परी शेखसाहेबापाशीं गाठोळी नेली. यावरी तेथें राजखान वैद्य होता, त्यानें पारखिलें. सोमल ठरला. उपरी खुद्द खासा शेखसाहेब बोलिले जे, अजि कांहीं करावें तर बराबर उदईक करणें तें करावें म्हणून निरोप दिल्हा. हरदुजणा·जामीन बिलपशील—खानाजी पाटील तुला व सावजी पाटील शिदोजीस दिले. ऐसें करून गांवास लावून दिल्हे. मग शिदोजी पळून गेला. उपरी तुम्हीं अयोस्तर गोत आऊद (?) वजित जाले तेव्हां खोटा जाहला. तूं निमेचे वतनदार शिदोजीस निराईच्या हिश्यासी बोलावयास संबंध नाहीं. हलीं हें लिहिलें. सही छ. २१ मोहरम शके १६५० विकारी (नाम) संवत्सरें माघ वद्य ६ सोमवार.

| साक्ष पाटील. | बलुत. |
|---|---|
| १ सावजी पाटील. | १ लखा महार. |
| १ रामजी पाटील. | १ माणा महार. |
| १ हणगा पाटील. | १ जानोजी तेली. |
| १ सुलतानजी पाटील. | ३ |
| १ कुसाजी पाटील. | |
| १ संताजी कृष्णाजी. | |
| ६ | |

---

**वतनपत्र ५.**

वतनें करार सुरूसन इसन्ने अर्बैन.

खंडो शिवदेव उपनाम पानशी गोत्र मुद्गल सूत्र आश्वलायन ज्योतिषी व कुळकर्णी मौजे दिवें कर्यात सासवड व मौजे सोनोरी तर्फ कन्हेपठार प्रांत पुणें सरकार जुन्नर यांसी दिल्हें वतनपत्र ऐसें जे, तुम्हीं शाहूनगर नजिक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसन्निध विनंती केली. हरदो गांवचीं सदरहू दोन्ही वतनें पूर्वी गिधवीयाचीं होतीं. त्यांनीं आपल्या वडिलांस दान देऊन दानपत्र करून दिल्हें. त्यावरून वतन अनुभवूं लागले. त्यास मौजे सोनोरी येथील कुळकर्ण चालवावयासी कृष्णाजी गाऊजी उपनाम गांवखंडेराऊ मुतालीक ठेविला होता. त्याचा लेक रामाजी कृष्ण आपला आजा गोविंद विश्वनाथ

यांसी कुळकर्णाबद्दल कजिया करूं लागला. याजकरितां महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामीसंनिध किल्ले राजगड मुक्कामीं जाऊन वर्तमान निवेदन केलें. त्यावरून रामजीस हुजुरून आणून हरदो जणाचे करीने मनास आणिले, आणि मौजे पोहुरी मुद्रुक तर्फ गुंजणमावळ प्रांत मावळ येथें दिव्य नेमून दिल्हें. तेथें दोघानींही दिव्यें केलीं. रामाजी कृष्ण दिव्यमुखें खोटा जाहला. त्यानें अजीजखत लेहून दिल्हें. आपला आजा गोविंद विश्वनाथ खरा जाहला. त्यावरून थळकरांनीं थळपत्र करून दिल्हें. तें महाराजें स्वामींनीं मनास आणून हुमालपत्रें करून दिल्हीं. त्याप्रमाणें वतन अनुभवीत आहों. परंतु पत्रें जीर्ण झालीं, भोगवटीयास पत्रें पाहिजेत. याजकरितां महाराजाहीं कृपाळू होऊन नूतन पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे. ह्मणून विदित करून महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामींचें पत्र व गिधवीयाचें दानपत्र व रायाजी गांवखंडेराऊ याचे अजीजपत्र व थळपत्र ऐसीं चार पत्रें आणून दाखविलीं. पत्रें बितपशीलः—

महाराज कैलासवासी यांचें पत्र दिल्हें. "अजरख्खाने राजश्री शिवाजी राजेसाहेब दामदौलत हू बजानेबू मोकदमानी व रयानी समस्त प्रजा मौजे सोनोरी परगणे पुणें बिदामद सुरुसन तिसा सितैन अलफ. गोविंद विश्वनाथ पानशी जोतिषी व कुळकर्णी मौजे मजकूर यासी व रामाजी कृष्ण गांवखंडेराऊ वस्ती कसबे सासवड यासी कुळकर्णाबद्दल भांडण लागलें होतें. याचा निवाडा होऊन महजर झाला ऐसाजे, रामाजी कृष्ण गांवखंडेराऊ हुजूर येऊन मालूम केलें जे, आपलें कुळकर्ण मौजे सोनोरी तर्फ कऱ्हेपठार परगणे पुणे आपली मिरास आहे. यानीं गोविंद पानशी आपणासी कईणी (?) कुळकर्णाबिदल भांडत आहे. तरी साहेबीं गोविंद विश्वनाथ यास हुजूर आणून आपली व त्याची बरहक मुनसुफी करून निवाडा केला पाहिजे. म्हणून मालूम केलें. त्यावरून गोविंद विश्वनाथ यास तलब करून आणून दोघाजणांची हकिकत मनास आणून तकरिरा घेतल्या छ १९ माहे शाबान.

"गोविंद विश्वनाथें तकरीर केली ऐसीजे, गिधवीयाची मिरास जोतीष व कुळकर्ण देह २ तपशील. मौजे दिवें कर्यातसासवड व मौजे सोनोरी तर्फ कऱ्हेपठार परगणे पुणें सदरहू गिधवीयाची मिरासी. गिधवे आपले यजमान परंपरा, आपण त्यांचे उपाध्ये ह्मणून गिधवीयानीं आपला मूळ पुरुष लक्ष्मीधरभट पणजा होय त्यासी पाय धुवून दान दिधलें. दानपत्र गोही साक्षीनिशीं स्वहस्ताक्षरें वृत्ति लेकराचे लेकरीं करून दिल्ही. यावर किल्येका दिवशीं गिधवे काशीस गेले. आपला पणजा लक्ष्मीधरभट लेहूं जाणत असें. ह्मणोन कुळकर्ण चालवावयासी हरदो गांवीं मुतालीक ठेविला असे. जोशीपण चालवीत असे. याचे पोटीं परशरामभट जाहला. तो आपला आजा होय. हा जाणता जाहला यावरी मौजे दियाचें कुळकर्ण चालवून असे व परशरामभटाचा भाऊ दुसरा भटपण जाणत असतो. दोही गांवचे जोतीष चालवून असे. व तिसरा भाऊ विठोबा व्यापारास जात असे. याबद्दल सोनोरीस मुतालीक हरकोणी ठेऊन चालवीत असे.

ती मग विठोबाचा नारोबा तो जाणता झालीयावरी सोनोरीचे कुळकर्णावर कित्येक दिवशी ठेविला. याउपरी परशरामभट आपला आजा, त्याचे पोटी आपला बाप विसाजी व चुलते जाहले. हे थोडेबहुत लेहू शिकले परतु लहान लहान असत. मौजे दियाचे कुळकर्ण चालवून असत. यावरी आपल्या बापाचा मामा दाणी सासवडकर याचे शेत मौजे सोनोरीस वोवाडीयाने करीत असे. त्या शेतावरी कृष्णाजी गावजी खंडेराऊ खटपटेस ठेविला होता. त्यास आमचे वडिलाचे मामाने आमचे अजाहती मुतालीक ठेविला. मौजे सोनोरीचें कुळकर्ण चालवावयास जाणते होत, तोंवरी एक दोन वर्षे चालविणे, व शेताचीही खटपट जैशी करतात तैशी करणे. हे जाणते झाल्यावर आपलें कुळकर्ण चालवितील ह्मणून ठेविला होता. त्यावरी आपला बाप व चुलता हे लेहों शिकले, जाणते जाहले. मग कृष्णाजीस दूर करून दोही गावचे कुळकर्ण आपण चालवू लागले. ऐसें असता कित्येक दिवशी, नाईकजी पाटील मोकदम मौजे मजकूर कुळकर्णाचा मुशाहिरा मागता मोकदमामध्ये व लुखोबा आपला चुलता यामध्ये कटकट झालीयावरी मोकदमें लुखोबास मारिलें. याबद्दल आपले वडील रुसोन माराच्या भेणे राहिले. पुढे नाईकजी पाटील याने कृष्णाजी गाऊजीस बोलावून कुळकर्णाचें लिहिणें लिहू लागल्यावरी, आपले वडिली कृष्णाजीस ह्मटलें की, आपण रुसोन राहिलो आहो, आणि तू मौजे मजकुरास जाऊन कुळकर्णाचे लिहिणें चालवितोस तें चालवू नको. यावरी कृष्णाजी सासवडास उगाच राहिला. कुळकर्णाचे कामाचा बोभाटा पडू लागला. याबद्दल आपले बापाचा मामा दाणी सासवडकर याने आपले वडिलास ह्मटले जे, तुह्मी रुसोन घरी राहिला. दिवाण काम चालत नाही. पाटलाची व तुमची समजाविशी होय तोंवरी चार दिवस कृष्णाजीस मुतालिकी देऊन ठेवणे. त्यावरी आपले वडिली मुतालीक करून ठेविला. पाटलाची आमची समजाविशी झाली नाही. ऐशामध्ये रगमट दत्तभट राखिया सेकिन सासवड दिग्यास आला होता. त्याने एके घरी निसरवा घेतला, ह्मणून आपल्या चुलत्यानें मारिला. त्या दुःखें राखियानें काशीस जाऊन गिधवी याचा वंश त्याची भेट घेऊन त्यास सांगितलें की, तुमच्या वडिलाची मिरास मौजे दियेस व सोनोरीस आहे. येऊन चालवाना हें उचित नाहीं. ऐसें त्यानीं नानाप्रकारें उपदेश करून घेऊन आला. गिधवी यानीं आपले वडिलास पुशिलें की तुम्ही दोही गावचें कुळकर्ण व जोतिपपणा खाता करावरून ते सागणे. त्याहीं त्या गिधवी यांचे दानपत्र लिहून दिल्हें होतें व गोही लिहिलें होतें. पत्र पाहून गोही मनास आणून मागुती आपलीहीं दानपत्रें करून दिल्हीं असता, काशीचा वियोग करून आह्मास घेऊन आलास ऐसें बोलोन ते मागुती काशीस गेलीयाउपरी लुखोबा आपला चुलता त्यास देवाज्ञा झाली पाटिलाची व आमच्या वडिलाची समजाविशी झाली नव्हती. तेशामध्ये कारकीर्द रायो निवाजी मुकासाई फसबे सासवड याचे वेळेस पाडागळा जेजुरी श्री खंडेराऊ याचा भक्त व राभोजी

मबाजीही खंडेराऊ याचा मक्त याची हकिकत करून उभा राहिला. की, मौजे दिये व मौजे सोनोरी दोहीं गावचे जोतीप कुळकर्ण, आपली मिराशी, गिधवी या आधी आपली मिराशी ऐसे बोलिला. त्यामध्ये व आपल्या वडिलामध्ये वाद झाला मग निवाडीयासी श्री अमृतेश्वर मुक्कामी ह्मसळे कोकणात आहे, तेथे आपला बाप विसाजी परशराम व पाडागला गेले ते जागा आपले बापे दिव्य केले, रवा काढिला, खरा झाला. ह्मसळाचे धळपत्र दिल्हे, ते घेऊन विसाजी परशराम आला पाडागला खोटा झाला. सदरहू हकिकत राघो निबाजीस सागितली व रवा काढिला, खरा जाहला, ते स्थळपत्र दाखविले. त्यावरून राघोजी मबाजीन पाडागला यासी दटाविले की, कईणी आमचा निशा केला की, एकाची मिराशी आपली ह्मणोन तुटीलासी. ब्राह्मण म्हणोन *तुजला सोडिले ते वेळेस ऐसा निवाडा झाला नाईकजी पाटील होता तो मृत्यु पावला.* पुढे थोरला दुकाळ पडला. आपला बाप गावी होता आपण पाचा भाऊ व कुटुब थोर. दुकाळाकरिता पोट भरेना. तैशामध्ये आपल्या घरासी आगी लागोन जळाले त्यामध्यें गिधवी याचे दानपत्राचे कागद होते ते व म्हैसळा दिव्य केले तेथील कागद पत्र आपली बिशाद होती ते जळाली आपण व आपले भाऊ लहान लहान होतो. गावावरी पोट भरेना. मग आपला बाप विसाजी परशराम कारकीर्द महाराजसाहेब पुणीयास गेला. ते वेळेस नाईकजी पाटील याचा लेक हस पाटील व रत्नोजी पाटील, रामाजी कृष्ण वाणीयास दिवाण कामावद्दल आले होते ते हस पाटील, रत्नो पाटील आपले बापास बोलिले की, नाइकजी पाटीलामध्ये व लुखोबामध्ये कटकट झाली होती ते दोघे मरोन गेले आपण तुम्हासी काही किलाफ धरीत नाही आपण व तुम्ही मिरास भाऊ आहो. आपले कुळकर्ण व जोतीष सुखें खाणे ऐसें समाधान केलें. त्यावरी आपले बापें रामजीस ह्मटले की कुळकर्णाचे निसबतीचे कागद तुजपाशी आहेत ते समजावून मज देणे अनमान असेल तर दादाजी कोंडदेऊ सुभेदार हकीम आहेत त्याजपाशी चाल. त्यावरी रामाजीने पाटलास ह्मणोन आठ दिवसाची मुदत सागोन मोईन केली जे आठा दिवशी येऊन कागद समजावून देईन ऐसा नेम करून ठाणातून गावास गेला आणि रामाजीने हस पाटिलाचा धाकटा भाऊ बैजी होता त्यासी परोबा करून शफत घेतली जे, तू मोकदमी करणे आपण कुळकर्ण करीन. पानशी जोशीपण करितात तैसे करितील. त्याचे कुळकर्ण आपणास देणे या तहास हस पाटिलामध्यें व बैजी पाटलामध्ये कसूर वाढविला आणि रामाजी कागद नेदी, तो गाव टाकून कर्नाटक प्राती गेला. त्यावरी आपले बापें पाटिलास कागद लेहून दिल्हा की, रामाजीस आठ रोजा नेम करून तुह्मी घेऊन गेला त्यास बोलास पधरा वीस दिवस झाले. कागद पाठविले नाहीत ह्मणून लिहिले शेवट हस पाटील व रत्नो पाटील बैजीस म्हणत की, पानशी मिरासदार आहेत. आमची क्रिया गुतली आहे की याच्या हाते कुळकर्णाचे काम घ्यावे. आणि बैजी मजकूर

ह्मणे कीं रामाजीस हातीं धरावें. याबद्दल कुसुर वाढला. त्याकरितां आपला बाप गांवात गेला नाहीं. कोकणामध्यें व्यापार करून गेला. त्यावरी भेजीनें मारा करून आपला वडील भाऊ हस पाटील जिवें मारिला. आपलाही बाप कोकणांत मरोन गेला. आपण धाकटे नेणते होतों. ते जाणते जाहले त्यावरी कारकीर्द महाराजसाहेब नारो सुंदरास हवाला पुण्याचा होता. त्यांची भेट घेऊन आपली हकिकत सांगितली. त्यावरून तीहीं कुळकर्णाची दुमाले चिट्ठी दिधली. मग रखमाजी पानशी आपला गोत्रज कुळकर्ण चालवावयास ठेविला. तो कुळकर्ण चालवीत असतां, रामजीनें राजश्री महाराजसाहेबांस गलत मालुमात केली जे, मौजे सोनोरीचें कुळकर्ण आपली मिरास. पांच पिढ्या खाइलं आहे. आणि पानशे खलेल करितात. ह्मणून सांगितलें. त्यावरून महाराजसाहेबीं नारो सुंदर हवालदार परगणे मजकूर यास खुर्दखत दिधलें कीं, रामजी याची व पानशी याची बरहक मनसुफी करणें. याचे कुळकर्ण हकदिरेनी गोहीसाक्षीनिशीं होईल त्याचे दुमाला करणें ह्मणून सादर झाले. त्याजवर नारो सुंदर, दोघे वादे व गांवीचे मोकदम व मुखेसर वलुते व हमराही गांवीचे गोत मेळवून मनसुफी करून निवाडा करावा तो केला नाहीं. व खुर्दखत कैसें आहे तेंही आपणास दखल नाहीं. नारो सुंदर याचा हवाला पुरलीयावरी खुर्दखत ठाणानें घेतलें. तेंही कोणाचा ठायकें नाहीं व आपणासही ह्लीं वाद सांगतां कळलें. रामाजी मजकूर गांवात येऊन रखमाजी पानशे कुळकर्ण चालवावयासी आपण ठेविला होता, त्यास ह्मणों लागला जे, महाराज स्वामीचे व ठाणाचे खुर्दखत घेऊन आलों आहें. कुळकर्ण आपले दुमाले केलें आहे. तूं आपणास कागद लेहून दे कीं कुळकर्ण आपलें नव्हे. त्यावरी आपलें मनीं रखमाजीनें विचारिलें कीं त्रिंबक विश्वनाथ सुभा चाकरी करीत असतां संभाजी मोहिते यानें धरिलें आहे. त्यामध्यें व नारो सुंदरामध्यें आकरा आहे. याकरितां इलाज न चाले. व भेजी पाटील व रामजी दोघे एक होऊन आपणास जिवें मारितील. ऐसा विचारून कासद मौजे दियाच्या मोकदमाच्या नावें ठाणां अर्जदास्त दिधली कीं, आपणास व रामाजीस संबंध नाहीं. त्रिंबक विश्वनाथ धणी आहे. तो जाणे व तूं जाणस. रखमाजीनी निवाडा नाहीं. ऐसी

पांडिये यानीं हमशाही गांवास खुर्दखतें पाठविलीं कीं, पानशी याचा व रामजी गांवखडेराऊ याचा मौजे मजकुरच्या कुळकर्ण्याचा अंमल कैसा आहे तो, आपलाले इमान राखोन पूर्वज स्मरोन हक असेल तें लिहून पाठवणें. त्यावरून हमशाही गांवचे मिरासदारी आदीस साक्ष साक्षीच्या लेहून पाठविल्या बितपशीलः—

परगणे पुणें.

१ मौजे लोणी काळभर तर्फ हवेली.
१ आळंदी तर्फ सांडस.
३ तर्फ कऱ्हेपठार परगणे पुणें.
  १ पिंपळें.
  १ बाणपुरी.
  १ आंबोडी.
  ―
  ३
१ सोनोरी बारा बलुतें.
―
६

कर्यात सासवड.

१ कसबा, देखील देशमुख, देशपांडे, व स्थळकरी.
१ मौजे दिवें.
―
२

परगणे सुपें.

१ सुपें खुर्द.
१ कुंभारवळण.
―
२

यांनीं लेहून पाठविलें कीं, मिरास पूर्वी दिवें व मौजे मजकूर येथील ज्योतीष व कुळकर्ण गिधवीयाचें. गिधवीयानीं पानशीयासी मिरास करून दिल्ही. त्यावरून कित्येक दिवस पानशी चालवीत असतां, दरम्यान सोनोरीच्या मोकदम्यामध्यें व लुखोबा पानशी यामध्यें मुशाहिऱ्याबद्दल फटफट झाली. मग कृष्णाजी गांवखडेराऊ वस्ती मौजे सासवड तेथें थोवाडीयाचें, दाणी यांनीं आपल्या शेतावर ठेविला होता. लुखोबा रुसोन राहिला म्हणून लुखोबाचे मामा दाणी यांनीं पानशी यासी म्हणून कर (!) मजकूर ठेविला. तो पानशिया मुतालीक होय. आपणास ठावकें असे. ऐसे मोईनें कागद ठाणां आलीयावर आपणास दुमाले चिठी दिधली. कुळकर्ण आपलें दुमाले केलें. महजर करावा तों देशमुख व देशपांडे औरंगाबादेस गेले. त्यांची वाट पहात आपला भाऊ मोरो विश्वनाथ पुण्यास राहिला. यावरी देशमुख व देशपांडे आले. त्यांपाशीं आपला भाऊ मोरो विश्वनाथ बोलिला कीं, साक्षीप्रमाणें आपणांस महजर करून देणें. ते बोलिले कीं, आम्हीं जें करूं त्यास तुम्हीं राजी आहां ऐसा कागद लेहून देणें. त्यावरून मोरो विश्वनाथ बोलिला जे साक्षी गुदरल्या आहेत; इतकीं ज्योतीष सातों तेंच कुळकर्ण माणें म्हणून महजर करून द्याल तर मान्य असो. अगर परभारां पाठवाल तर जाऊं. परंतु निवाडीयाचा अमलात मोघम कागद मागतां, तो उगाच देववत नाहीं. यावरी रामाजी गोत मान्य केला. आणि ठाण्यांतून गर दुमीर होऊन साहेबांचे सेवेसी आला. हे तकरीर महजर."

३

" तकरीर रामजी कृष्ण गांवखंडेराऊ यानें तकरीर केली जे, मौजे मजकुरचें कुळकर्ण आपलें मिराशी आहे. आपला आजा गाऊजी, आपला बाप कृष्णाजी व आपण ऐसें कुळकर्ण कारकिर्दे दर कारकिर्दे खादलें आहे. पलिकडे ठावकें नाहीं. नाईक पाटील होता तो आपणास मुशाहिरा नेदी, ह्मणून त्यामध्यें व कृष्णाजी गाऊजी आपला बाप त्यामध्यें करकर झाली. आपण पोट भरावयास गेलों. मागें लुखोबानें कुळकर्ण चालविलें. मागुती आपण येऊन कुळकर्ण चालवूं लागलों. त्यावर कारकिर्दे महाराजसाहेब, रखमाजी पानशी कुळकर्ण चालवीत होता. तो त्रिंबक विश्वनाथें ठेविला होता. तों आपण महाराजांचें खुर्दखत आणिलें. तेणेंप्रमाणें ठाणाचें खुर्दखत आणिलें आणि रखमाजीस दूर करून कुळकर्ण चालविलें. ह्मणून तकरीर केली. सही. "

सदरहू दोघांच्या तकरिरा मनास आणून दोघा वादियास म्हटलें कीं, तुम्हीं गोतास राजी असाल तर गोतांत पाठवूं अगर परस्थळास राजी असाल तर परस्थळास पाठवूं. अगर हमशाई गांवीचे मोकदम व मोख्तेसर व मौजे मजकूरचे मोकदम व बारा बलुते यांसीं राजी असाल तर यांचे गोहीवरून मनसुफी करून. जे गोष्टी तुम्हांस मानली ते सांगणें. त्यावरी रामजी गांवखंडेराव बोलिला कीं, दुनियामध्यें मनसुबीकरितां आपणास खोटें केलें आहे, तरी साहेबीं भले लोक बैसवून बरहक निवाडा केला पाहिजे म्हणून रामजी बोलिला. मग गोविंद विश्वनाथ यास पुशिलें, तूं कोणे गोष्टीस राजी आहेस ? त्यावर गोविंद विश्वनाथें बोलिला जे, जे गोष्टीस रामजी राजी असेल तेच गोष्टीस मान्य असे. ऐसें राजीनामे लेहून दिल्हे. यावर सभासदीं हरदोजणाच्या तकरिराचीं उत्तरें मनास आणितां, गाऊजी गांवखंडेराऊ रामजीचा आजा बुद्वा असतां, कृष्णाजी गाऊजी, रामजीचा बाप पानशी यांनीं मुतालीक ठेविला. मौजे मजकूरच्या कुळकर्णाबद्दल ठेविला होता. त्यापलीकडे त्याचा कांहीं भोगवटा नाहीं. रामजी लहान होता. तो थोर जालीयावर महाराजसाहेबांचें खुर्दखत आणिलें. त्यामध्यें मालुमाती पांच पिढ्या कुळकर्ण चालविलें, ऐसी मालुमात करून खुर्दखत आणिलें तर गाऊजी मजकूर रामजीचा आजा दाणी याचा पालक पुत्र विदेशी पांच पिढ्यांस जागा नाहीं, ऐसें रामजीच्या मुखें खरें झालें, वरफड हीं कलमें रामजीच्या मुखें निरोत्तर झालीयावर रामजी बोलिला जे, मौजे मजकूरचे मोकदम मोख्तेसर व बलुते हमशाही गांवीचे गोहीवार बोलावून आणून त्यांचे गोहीवरून निवाडा केला पाहिजे. म्हणून त्यावरून मौजे मजकूरचे मोकदम व मोख्तेसर व बलुते व हमशाही गोत हुजूर आणून त्यासी आण प्रमाण घालून पुशिलें. तीहीं गोही दिधल्या.

कसबे सासवड येथील देशमुख व देशपांडे यांनीं व गांवलोक मिळोन रेऊ नाईक बिराजर देशमुख व अमाजी चिंचवडा नाईकवाडी व महार पाठविले.

मौजे पिपळें.

२ मोकदम.
१ चौगुला.
१ भानजी कुळकर्णी.
४

सुपेंखुर्द, परगणे सुपें.

१ मोकदम.
१ चौगुला.
२

मौजे कुंभार वलण परगणे सुपें.

१ मोकदम.
१ चौगुला.
२

मौजे बेलसर, कसबे सासवड.

नारो बहिरव कुळकर्णी उमर वर्षे९२ एकूण १.

मौजे वणपुरी.

१ येमाजी मोकदम.
१ महार.
२

मौजे आंबोडी.

१ मावजी मोकदम.
१ भानजी कुळकर्णी याची आर्दास.
१ महार.
३

मौजे हिवरें, तर्फ कऱ्हेपठार, परगणे पुणें १.

मौजे दिवें, कर्यात सासवड.

२ मोकदम.
१ खेऊजी उमर वर्षे ६० साठ.
१ परसोजी उमर वर्षे ४०.
२

१ कमळोजी बिन जानोजी चौगुला उमर वर्षे ४०.
१ खंडोजी काळा उमर वर्षे ७०.

१ माऊजी भावकर उमर वर्षे ७०.
१ येस मेहेतर माळी उमर वर्षे ९०.

२ महार.
१ बाका उमर वर्षे ८०.
१ बरवा उमर वर्षे

मौजे सोनोरी.

२ मोकदम.
१ माणकोजी बिन हस पाटील.
१ मोरोजी बिन रतन पाटील.
२

१ जानोजी बिन माऊजी बिरादर मोकदम.
१ संताजी चौगुला.
२ कुलवाडे.

११ बलुते.
१ नाव सुतार.
१ बहीर परणा.
१ पिलवरठा.
२ चांभार.
१ माऊजी.
१ निसणा.
२

१ लखमा कुंभार.
१ जेवा न्हावी.
१ वहिरा घडसी.
२ महार.
  १ तुळज्या.
  १ परसा.
१ नाना मांग.

आवरीसा पाठवून दिल्हा आपल्या ११

नांगरामिशी. १७

१ लोणी काळभर. लंग
१ आळंदी.
—
२

येणेंप्रमाणें गोहीदारांस महारकूट व चांभारकुंड काढून मांगमिझारीनें पत्र तुमचे शिरीं आपलाले पूर्वज स्मरोन जैसें यथार्थ असेल तें सांगणें, ह्मणून शपथ घातली. यावर गोहीदारीं गोही दिधली जे, मौजे मजकूरचें ज्योतीष व कुळकर्ण गिधवे मिरासदार होते. त्यांहीं पानशी याच्या वडिलांस मिरास लेंकराचे लेंकरी दिल्ही, हें आपणास ठावकें आहे. हें सत्य ऐसें. खेरीज जानोजी बोलिले व जानोजी बिन बैजी बिरादर मोकदम मौजे मजकूर हा एक बोलिला कीं, राघजी गांवखंडेराऊ हा मिराशी कुळकर्णी ऐसें आपला बाप बैजीनें सांगितलें होतें, हें खरें. ऐशी गोही ( साक्ष ) गुदरली व समस्ताजणांची एकच गोही गुदरली, आणि एकल्या जानोजीची निराळी गोही झाली. सदरहु गोही झाली याबद्दल दोघांचीही कुसुर तुटावा, याबद्दल हरदोजणांस दिव्य नेमिलें. श्रीअमृतेश्वर मुक्काम मौजे मोहरी बुद्रुक तर्फ गुंजणमावळ तेथें दोघांनीं वेगळालें दिव्य करावें. तपेली दोन व ताह्मने दोन व रवे दोन, तेल तूप एकसारिखें वजन करून ताऊन बराबरीच दिव्य करावें. खरा होईल तो मिरास लेंकराचे लेंकरी खाईल. खोटा होईल तो मिराशी वेगळा. दोघांही खरे झाले तर दोघांसही निंभ (निम) वांटून यावे. दोघेही खोटे झाले तर दुरीच करावें. ऐसा तह होऊन दोघां वादीयांस पुशिलें. सदरहूप्रमाणे राजी झाले. यावरी हुजरून आबाजी मोरदेव चिटणीस मिरासदार, मौजे चिमणगांव, परगणे वाई व मलकोजी बिन वाघोजी कदम हलीं चाकर हुजुरांत व गोहींदार सदरहुपैकीं मौजे मजकुरचे मोकदम व बलुते छ... रमजानी मोहरीस पाठविले. तेथें मोहरीचे मोकदम व बाजे मध्यिक लोक व हमशाही गोत मिळोन ... वादी यांनीं उत्तरें मनास आणितां बोलिले बितपशील:—

गोविंद विश्वनाथें सांगितलें जे, मिधवे पाहिले मिरासवार होते तेहीं आपल्या वडिलास मिराशी करून दिल्ही हे सत्य.

रामजी कृष्णे सांगितलें जे, आपण मिरासदार मिधवीयासी व पानशीयासी या मिराशीचा संबंध नाही. आपला आजा व बाप आपण कुळकर्ण खात आलों हे खरें.

येणेंप्रमाणे उत्तरें आयकोन गोहीदारास पुशिलें गोहीदारीं सदरहू लिहिलें तेणेंप्रमाणे साक्ष दिल्ही यावरून रामजी मजकूर खोटा जाहला. या उभयतापासून दिव्य करावें नलगे; ऐसें थळींचे प्रष्णिक बोलिले. यावर आबाजी मोरदेव व मळकोजी हुजूरून पाठविले होते, हे व कोणी प्रष्णिक बोलिले जे, राजश्री... साहेबी उभयतास दिव्य करावयासी पाठविलें आहे. यापासून दिव्य न घेतां दोघांचें भांडण दूर होत नाही. श्रीदेवावरी भार देऊन निवाडीयाबदल स्थळास पाठविलें आहे ती देवापुढें व अग्नीपुढें अकस कोसीस होणार नाही. दिव्यीं जे निवडेल तैसे बोधे वर्ततील. ऐसें बोलोन वेगळाली तपेली, वेगळाली ताम्हनें व वेगळाली मडळे व वेगळाली तेलें, तुपें एकसारखी व वेगळाले रवे एकसारिखे वजन करून बराबरीच दिव्य करविलें. हरदोजणाचे शिरी चीरपत्रे बाधोन मडळे चालत आहे आधी गोविंद विश्वनाथें रवा कादून बाहीर ठेविला गोविंद विश्वनाथ खरा झाला. रामजीनें ताम्हनांत हात घालून रवा काढितां बोटे जळाली झणून रवा ताम्हनातच टाकिला, पुरता रवा बाहीर काढिला नाही. बोटे भाजली, रामजी खोटा झाला. तेच समयीं तेथल्या लोकास कळलें. मग पिशवी घालून लाखोटे करून तिसरे दिवशी मंगळवारी हात पाहिले तों गोविंद विश्वनाथ खरा झाला. रामजीची बोटे पोळली, तो खोटा जाहला. थळींचे निवाडीयाप्रमाणे निवाडपत्र घेऊन, हरदो घेऊन राजगडास आले. हुजरूनही तमाम खलके हात पाहिले तों गोविंद विश्वनाथ निर्मळ खरा झाला. यावरून मौजे मजकूरचें कुळकर्ण, ज्योतीषपण लेकराचे लेकरीं औलाद आफलाद चालवणे. रामजीचे हात पाहताच पाचही बोटे भाजली, तो खोटा झाला मिराशी वेगळा देवें केला. रामजीस अगर त्याचे भाऊबंद व दाईज गोत्रज असतील त्यास मौजे मजकुरच्या कुळकर्णासी संमध नाही. खोटा झाला तो दूर केला. अर्थाअर्थी संमध नाहीं. येणेंप्रमाणे निवाडा झाला. त्यासी हिंदू होऊन अन्यथा करील त्यास काशीमध्यें गोहत्या व महाहत्येचें पातक असे, व मुसलमान होऊन अन्यसारिखे करील त्यास मकेमध्यें सोर मारल्याचें दोजक असे गावखंडेराऊ कित्येक मालुमातीची व वकीलातीचे वळे कागद दिवाणातील व गोतानें करून घेतले असतील, ते कुल्ही रद्द असेत. गोविंद विश्वनाथ यानें लेकराचे लेकरीं औलाद आफलाद परंपरेनें मौजे मजकुरचें कुळकर्ण व ज्योतीष खाऊन असावें. येणेंप्रमाणें निवाडा झाला आहे तर बरहुकूम निवाडा अमल करणें. तालीक घेऊन असल पत्र गोविंद विश्वनाथ यासी परतोन देणे म्हणून महजर कैलासवासी स्वामीचा १.

" दानपत्र शके १५४९ प्रभवनाम सवत्सरे, अश्विन शुद्ध त्रयोदशी, भृगुवासर ते दिवशी लुखोबा परशराम व विसाजी परशराम पानशी कुळकर्णी व ज्योतीषी मौजे दिये क्यात सासवड व मौजे सोनोरी, तर्फ कहेपठार, परगणे पुणें यासी रंगो त्र्यबक व गणेश त्र्यबक गिधवे, नमस्कार लेहून दिल्हे ऐसेजे, आपले वडिली वेदमूर्ती लक्ष्मीधरभट पानशी यासी दोनी गाव ज्योतीष व कुळकर्ण दान दिल्हे. आमचे वडील कासीस वास करावयासी गेले त्यास त्याचे देहावसान भागिरथीतीरी झाले त्यास साप्रत शके १५२७ रामभट राख्ये तेथें आले. त्यानी आम्हास वर्तमान सागितले की, तुमच्या वडिलाची वृत्ति पानशी बळेच खाताहेत. हे तिसरी पिढी चालत आहे दत्तोबा राख्या त्यासी तुमचे वृत्तिबद्दल भाडला. त्यास लुखोबानें तोंडचेतोंडी मारला. त्यावरून आपण तुम्हास वर्तमान सागावयासी आलो तुम्ही जाऊन आपली वृत्ति खाणे वृत्तिसाठी सन्यासग्रहण सोडून वृत्तीस रक्षण करावे. ऐसा बहुतप्रकारे बोध करून आम्हास इकडे पाठविलें त्यास आपण येथे आलो, तुमची भेट झाली तुम्हास वर्तमान पुशिले त्यास तुम्ही आमच्या वडिलाचे नावाचे व दस्तुरचें दानपत्र दाखविले की, आमचे वंशीचा अवलाद आफलाद कोणी तुम्हास वृत्तीचा वाद सागेल त्यास गोहत्येचे, मातृगमनाचें व सुरापानाचें, ब्रह्महत्येचे पातक असे. तुम्हीं लेकराचे लेकरी सुखें वृत्ति खाणे आमचे अवलाद आफलादेस तुम्हासी भाडावयासी समध नाही आपले वडिली लक्ष्मीधर भटाचे पाय धोवून दान दिल्हे व दानपत्र लेहून दिल्हे ते तुह्मी आह्मास दाखविले. त्या आपणास वडिलाचे पत्र प्रमाण झालें त्यावर तुह्मी बोलिलेस की, आपलेहीं पत्र करून देणे त्यावरून हें पत्र तुह्मास लेहून दिल्हे असे सुखे लेकराचें लेंकरी खाणे. आपली जे अवलाद आफलाद होईल त्यास तुह्मासी भाडावयाची गरज नाही. दोही गावचे ज्योतीष, कुळकर्ण दरोबस्त सुखे खाणे हे लिहिलें सही.—बितपशील रगो त्र्यबक गिधवे ओळी सुमार २५ पचवीस सही

मोही.

मोकदम मौजे दिये निशाणी नागर १
चाहुजी वजार मौजे दिये १

मालजी भापकर मौजे दिये १
भिला वरठा
नाईकजी बिन मावजी पाटील ईबिन बलजी पाटील काळे मोकदम मौजे सोनोरी निशाणी नागर १
देस माळी मौजे दिये १
प्रमाणें दानपत्र वार असे

माव मेहेतर चाभार १
जानोजी चौगुले मौजे दिये व कुळवाडी मौजे सोनोरी १
खडोजी गाढवे कुळवाडी मौजे सोनोरी १
भिक सुतार १
बहीर परणा १
बिमनाक महार १

" अजीजपत्र शके १५६० किलकनाम संवत्सरें, माघ वद्य प्रतिपदा, मंदवासर मुक्काम राजगड, ते दिवशीं गोविंद विश्वनाथ पानशी यासी रामजी कृष्ण गांवखंडेराऊ वस्ती कसबे सासवड सुरुसन तिस्सा तिसैन अलफ सन १०७८. कारणें अजीजपत्र लेहून दिल्हें ऐसेंजे, मौजे सोनोरी, तर्फ कऱ्हेपठार, परगणे पुणें येथील कुळकर्णावर तुमचे चुलते लुखो परशराम यांनीं आपल्यास मुतालीक ठेविलें होतें. लुखोबामध्यें व पाटलामध्यें मुशाहिऱ्या-बद्दल कटकट झाली. याजकरितां आपले कारकिर्दीपावेतों कुळकर्ण चालविलें. कित्येक कजिये तुह्मांसी बेइमान होऊन सांगितले. कागदपत्रही मालुमातीचे आणीत गेलों. त्यारा हल्लीं तुह्मीं आह्मीं भांडत महाराजसाहेब यांजजवळ आलों. महाराजसाहेबीं हमशाही गोताच्या व पांढरीच्या साक्षी मनास आणितां, गिधवे यांचे दोन्ही गांव मौजे मजकूर व मौजे दिवें गिधवे यांनीं पानशी यास दान दिल्हे आणि ते काशीस गेले. त्यावरून आपणांस खोटेंपण आलें. त्याउपरी जानोजी काळा बिरादर मोकदम मौजे मजकूर यानें लटकी साक्ष एक-त्यानें आह्मांसारिखी दिल्ही. त्यावरून महाराजसाहेबीं हरदोजणांस दिव्य नेमून दिल्हें. मौजे मोहरी तर्फ गुंजणमावळ येथें दिव्य करावयासी पाठविलें. तुम्हीं व आपण वेगळालें दिव्य केलें. तुम्हीं खरे झालेस. आपणास रवा लागला, खोटा जाहलों. मिराशी वेगळा देवें केलें. देवाघरीं व राजघरीं व गोतघरीं खोटा जाहलों. तमाम खलके तुम्हीं खरे म्हणोन टाळी पिटली. मग सभानायकीं आपणांकडून तुम्हांस पत्र लेहून देविलें तें दिल्हें. तर सुख-रूप लेंकराचें लेंकरीं तुम्ही कुळकर्ण व ज्योतीषपण मौजे मजकुरचें खाणें. आपणांस व आपले वंशिच्यांस व दाईज गोत्रजांस तुम्हांसी वृत्तिविषयीं भांडावयासी संबंध नाहीं. आपले घरीं वतनाविषयीं कित्येक कागदपत्र असतील ते फुळट असेत. सानिन हाल आपला कोणी तुम्हांसी कजिया करील तर गोताचा अन्यायी, दिवाणचा गुन्हेगार, तुम्हीं सुखरूप आपलें वतन खाणें, हें लेहून दिल्हें. सही बितपशील अजमासें ओळी ३१ अस्सल पत्रीं

गोही.

मुकुंद कान्हो देशपांडीये परगणे पुणें १
रंगो माणकेश्वर जोशी कुळकर्णी मौजे बोपगांव परगणे पुणें १
मोकदम मौजे दिवें निशाणी नांगर १
वाघोजी वीर माने मौजे दिवें १
वैजो मुकुंद कुळकर्णी मौजे मोहरी बुद्रुक तर्फ गुंजणमावळ १

विठ्ठल पिलदेव सुभेदार प्रांत मावळें १
नारो बहिरव कुळकर्णी व जोशी मौजे वेलसर १
माणकोजी व मोराजी पाटील मोकदम मौजे सोनोरी निशाणी नांगर १
येस माळी मेहेतर मौजे दिवें
नुका महार १

मालजी भापकर मौजे दिवें १ नाना मांग १
जानोजी चौगुले मौजे दिवें १ "

अजीजपत्र गोहीसाक्षीनिशीं

"थळपत्रें बेरामी श्रीसकलगुणसंपन्न सौजन्यसिंधुशिरोमणी परउपकारमूर्ती राजमान्य राजश्री राजमुद्रा व मोकदम शेटिये महाजन मौजे सोनोरी, तर्फ कऱ्हेपठार, परगणे पुणें गोसावी यांस–राजमुद्रा व मोकदम व शेटिये महाजन महास्थळ महाप्रयेक्षिक सभा समर्थ मौजे मोहरी बुद्रुक तर्फ गुंजणमावळ सुरुसन तिस्सा सितैन अलफ. नमस्कार व अनुक्रमें रामराम विनंती उपरी, राउळाचे गांवींचे कुळकर्ण अग्रवादी गोविंद विश्वनाथ पानशी व पश्चिमवादी रामजी कृष्ण गांवखंडेराऊ यांमध्यें मौजे मजकुरच्या कुळकर्णाचा कथला होता. याबद्दल हरदोजण राजश्री राजेसाहेब यांस राजगडास भांडत गेले. त्याउपरी राजेसाहेबीं ही गोष्टी मनास आणून निवाडा करीत होते. त्याउपरी हरदोजण दिव्य करावयास कबूल जाहले. मग साहेबीं बराबर आबाजी मोरदेऊ देऊन आपला हातरोखा आपणास पाठविला. कीं, गोविंद विश्वनाथ पानशी व रामजी गांवखंडेराऊ या दोघांस मौजे सोनोरीच्या कुळकर्णाबद्दल भांडण लागलें आहे, त्यास दिव्य करावें, ऐसा तह जाहला. हरदोजण दिव्यास कबूल झाले.तरी दोघांकडून दिव्य वेगळालेंच करवणें. ह्मणोन रोखा राजश्री आबाजी मोरदेऊ याबराबर देऊन पाठविले. त्याउपरी येथें दोघांनीं तकरिरा लेहून दिल्हा.

"अग्रवादी गोविंद विश्वनाथ पानशी तकरीर केली कीं, मौजे सोनोरी, परगणे पुणें, येथील कुळकर्ण गिधवी यांचें, आपण उपाध्ये गिधवी यांचे, त्या उपरी गिधवे वाराणशीस जावयास निघाले, आणि आपले वडिलांस पाय धोवून दिधलें. याउपरी आपले वडील भट होते त्यांस लिहितां येत नव्हतें. याबद्दल कित्येक मुतालीक ठेवीत गेले. त्यावरी आपले वडील लेहूं शिकलीयावरी कुळकर्ण चालवूं लागले. त्याउपरी मुशाहिऱ्याबद्दल मौजे मजकुरच्या मोकदमासी व आपल्या चुलत्यासी कसूर वादला, याजबद्दल आपला चुलता लुखोबा घरीं रुसून राहिला. मग रामजीचा बाप कृष्णाजी याऊजी शेत करून बोवाडीयानें होता. वस्ती सासवडी असे. त्याउपरी कृष्णाजी मुतालीक करून ठेविला. यावरी आपला वडील चुलता मेला. त्यावरी कृष्णाजीनें चालविलें. त्याअलीकडे रामजी चालवीत होता. त्यावरी दोन वेळां हरकिलें; मग गैरहजीर झाला. आतां हलीं आपण रामजीस हटकिलें त्यास रामजी ह्मणतो कीं, कुळकर्ण आपलें हें गिधवी यांचेंही नव्हे व तुमचेंही नव्हे ह्मणतो. तरी हें लटकें. हा आपला मुतालिक खरा. आपणास गिधवी नानी पाय धोवून मिरासी दिधली आहे हें खरें, आपली वृत्ति होय हे तकरिर केली."

"पश्चमवादी रामजी कृष्ण गांवखंडेराऊ तकरीर केली ऐसीजे, मौजे सोनोरीचें कुळ-कर्ण आपली मिरासी होय. आपले वडिलीं सिद्धी, दादिदी बाप, आजा व आपण स्वार

येतों. ऐसें असतां हल्लीं गोविंद विश्वनाथ पानशी उभा राहिला आहे कीं, मौजे मजकुरचें कुळकर्ण गिधवी यांचें. गिधवे वाराणशीस जातां आपल्या वडिलांस पाय धोवून दान दिल्हें आहे. कुळकर्ण आपलें ह्मणतो व आपणास मुतालीकही ह्मणतो. तरी आपण मुतालीक नव्हे हें आपलें मिराशी होय. मौजे मजकुरास गिधवी यास व पानशी यास संबंध नाहीं. ऐसें आपण दिव्य करीन. देव देईल तरी घेईन ऐसी तकरीर केली. "

सदरहूप्रमाणें हरदोजणीं तकरिरा केल्या. हरदोजण दिव्यास राजी जाले. मग सदरहूप्रमाणें दिव्य करावें. ज्यास देव देईल त्यानें घ्यावें, ऐसें आमचे स्थळीं झालें. मग सणवारि हाताचीं नखें काढून हात धोवून हातीं पिशव्या घातल्या. सवेंच आदितवारीं पहिले प्रहरीं तेल तूप आणून वेगळालें जोखून दोन्ही ताम्हनें मांडून टकबंदी अडीच अडीच शेर तेल तूप ऐसें तावून एक एका ताम्हनांत घातलें. ऐशीं ताम्हनें एक्याच पळामध्यें मांडून आंत रवे टाकून दोघांनीं बराबर दिव्य केलें. त्यावरी मागतीं दोघांचे हातीं पिशव्या घालून ठेविलें. सवेंच सोमवारीं जाहला मंगळवारीं हात पाहिले. श्री हुजूर आबाजी मोरदेऊ याउपरी रामजी कृष्ण खोटा जाहला. अग्रवादी गोविंद विश्वनाथ पानशी दिव्यीं खरा जाहला. मौजे मजकुरचें कुळकर्ण गोविंद विश्वनाथाचे चांभाळीं केलें. रामजी कृष्णास पुढें लेंकराचे लेंकरीं कुळकर्णास अगर जोशापणास संबंध नाहीं, ऐसा निवाडा जाहला. ते वख्तीं सोनोरीकर व दिवेंकर हजीर होते. फळलें पाहिजे व रामजीच्या जमानदाराकडून गोविंद विश्वनाथाचे पैके दिव्याचे टके, पावणेवीस टके सा रुके १९॥।६ देविले पाहिजेत. व रामजी-पाशीं कुळकर्णाचे कांहीं कागदपत्र असतील ते रद्द असेत. राजगुदीचे व गोतपतीचे जे असतील ते फुटी रद्द असेत. तुहीं या निवाडिया प्रमाणें यांचें कुळकर्ण सांभाळीं करणें, शके १५१० फीलकनाम संवत्सरें, माहो शुद्ध त्रयोदशी, बुधवार एकूण पत्र वोळीखेरीज तकरिरा १०० शंभर रास हे विनंति. येणेंप्रमाणें चार पत्रें आणून दाखविलीं, तीं मनास आणितां निर्णय जाहलें आहेत. याजकरितां स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन हलीं हें नूतन पत्र करून दिल्हें असे. गिधवी यानीं हरदू गांवींचें ज्योती-पण व कुळकर्ण तुह्मांस दान दिल्हें आहे. त्याचे वंशीचा अगर गोत्रपुरुष कोणी असेल त्यास, व रामाजी गांवखेंडराऊ सोनोरीच्या कुळकर्णाकरितां भांडत होता तो दिव्यमुखें खोटा जाहला, त्याच्या वंशीच्यास अगर गोत्रपुरुषास व पूर्वी दिवाच्या व सोनोरीच्या कुळीस

कृष्ण गांवखंडेराव वतनदार खरा म्हणवून लटकी गोष्टी दिल्ही होती. याजकारितां महाराज राजश्री थोरले कैलासवासी त्याची जीभ कापीत होते ते समयीं तुमचा आजा गोविंद विश्वनाथ यांनीं दरबार खर्च करून जानोजी मजकुरास सोडविलें. याकारितां त्यानें व समस्त गांवकरी यांनीं गोविंद विश्वनाथ यास सदरहू दरबारखर्चाचे ऐवजीं तरटीचें शेत गांव निसबतीनें जमीन डाग रुके ८६ चा इनाम करून दिल्हें आहे, तेंही तुम्हीं आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवीत जाणें. सदरहू जमिनीचा राजभाग होईल तो गांवकरी यांनीं तुम्हांस शेत दिल्हें ते समयीं पत्र लेहून दिल्हें आहे त्याप्रमाणें गांवकरी देतील. गांवकऱ्यांच्या करारांप्रमाणें सदरहू शेत अनभवून सुखरूप राहणें. शके ६८ दुर्मतीनाम संवत्सर, फाल्गुन शुद्ध चतुर्दशी, मंदवासर सुरुसन इसन्ने आर्बैन मया व अलफ येविषयीं पत्रें—छ १७ सफर—

१ मोकदमास मौजे दिवें व सोनोरी.
१ मुख्य पत्र.
१ देशमुख, देशपांडे.
१ देशाधिकारी.

४

## वतनपत्र ६.

हिरोजी बिन शिवाजी इबिन भिकाजी इंगुलकर मोकदम, मौजे कामथडी, तर्फ खेडेंबारें प्रांत मजकूर यांसी दिल्हें वतनपत्र ऐसेजे, मौजे मजकुरचे मोकदमीबद्दल तुजमध्यें व पिराजी बिन बाबाजी कोंडे देशमुख तर्फ मजकूर यांजमध्यें कजिया लागला होता, याजकारितां तुवां हुजूर सन सबा सलासीनामध्यें स्वामीसंनिध शाहुनगरनजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, मौजे मजकूरची मोकदमी दरोबस्त वतन आपलें; आपले वडिलीं अनभाविलें; त्यास आपला पणजा शंकराजी पाटीलकी करीत असतां, देशमुख मजकूर याच्या वडिलीं आपल्या वडिलांवर दंगा केला, त्यामुळे तो गांव टाकून परागंदा झाला. धामधुमेकरितां आपला आजा व बाप गांवावर आले नाहींत. मुलखास कौल झाला म्हणून आपण गांवास आलों, तों बाबाजी मुसलमान पाटिलकी खात होता. मनास आणितां आपला पणजा परागंदा झालीयावर मागें देशमुखांनीं बाबाजी मुसलमानास ( सुमारें ओळी च्यार फाटल्या आहेत. ) राजश्री नारो पंडित सचीव याजपाशीं उभा राहिलों. त्याजपाशीं तीन चार वर्षें होतों. तेव्हां त्यांनीं एक वेळ मौजे नसरापूर तर्फ मजकूर येथील मुक्कामीं पिराजी नाईक देशमुख यास आणून कजिया मनास आणिला. हरदोजणांच्या तकरीरा जमान घेऊन मौजे मजकूरच्या व महालच्या वतनदारांच्या साक्षी पाहिल्या. राघो मोरेश्वर देशपांडे तर्फ मजकूर याजकडे आपल्या कागदपत्राचे

ठिकाण लागले. त्यानें याचेसें केलें. तों देशमुखांनीं त्यास दबविलें, त्या (सुमार एक ओळ फाटली आहे.) इनसाफ न झाला. तों पुढें राजश्री नारो पंडित मृत्य पावल. आपला इनसाफ होत नाहीं. तरी स्वामींनीं देशमुखास आणून त्याचा व आपला करिना मनास आणून इनसाफ केला पाहिजे, म्हणून विदित केलें. त्यावरून देशमुख मजकूर यास आणून इनसाफ करावा तों स्वामींची स्वारी मिरज प्रांतीं झाली. तूं स्वारीसमागमें होतास. पुढें सन आर्बैनांत स्वामींची स्वारी या प्रांतें झाली. तेव्हां शिवापूरचे मुक्कामीहून शिरवळास येतां, तुवां स्वारींत फिर्याद करून मुसलमानास दोही दिल्हीस. पुढें सन इहिदे आर्बैनांत राजश्री चिमणाजी पंडित सचीव यास आज्ञा करून देशमुख मजकूर यास तलब करून आणविलें. तो हुजूर आलीयावर त्यानें वर्तमान विदित केलें कीं, पुरातन मौजे मजकुरचें मोकदमीचें वतन आपलें. आपल्या वडिलीं मुसलमानास मौजे मजकुरची मोकदमी विकत दिल्ही आहे. इंगुलकराचा दाखला कांहीं नसतां कजिया करून मुसलमानास द्वाही दिल्ही आहे. तरी याचा बरहक निवाडा करावा म्हणून विदित केलें. त्यावरून पंडित मशारनिल्हेस आज्ञा केली कीं, या हरदोजणांच्या तकरिरा व जमान घेणें; त्यावरून तुवां तकरीर दिल्ही वितपशील:—

" तकरीर कर्दे वेशमी जवानी हिरोजी इंगुलकर आपलें वतन मौजे कामथडी, तर्फ खेडेंबारें येथील मोकदमी वडील वडील बाप कदम करीत आले. त्यास मातुश्री जिजाऊसाहेब यांचे कारकीर्दीस मल्हारजी पाटील याचा लेक खंडोजी, त्याचा लेक शंकराजी पाटील इंगुलकर पाटीलकी करीत होता व मौजे मजकुर मातुश्री आईसाहेबांचा गांव, तेथें देशमुख, देशपांडे याच्या हक्काचा दाखला नाहीं. सारा हक वसूल आईसाहेबांकडे उगवत होता. ते वख्तीं, राजश्री कानजी नाईक कोंडे तर्फ मजकुरची देशमुखी करीत होते. त्यास आमचे गांवीं शिमगीयाचें पोस्त झालें. तेव्हां गांवकरी यांनीं पोस्त ठाकराचे हातीं देशमुखाच्या घरास पाठविलें. देशमुख बाहेर गेले होते. ठाकरानें पोस्त देशमुखीणीपाशीं दिल्हें, तों देशमुख बाहेरून आले. तों ठाकूर वेसवरी बैसला आहे. तेव्हां देशमुखांनीं पुसलें जे, तूं काय निमित्य आला होतास ? त्यास ठाकूर बोलिला जे, पोस्त गांवकरी यांनीं पाठविलें होतें तें घेऊन आलों होतों. त्यास कानजी नाईक बोलिले जे, कोणापाशीं दिल्हें ? ठाकूर बोलिला जे, देशमुखीणीपाशीं दिल्हें. त्याउपरी देशमुखीणीस पुशिलें जे, पोस्त' तुजपाशीं दिल्हें कीं काय ? तेव्हां घरांतून बोलिली जे, पोस्त ठाकरानें आणून दिल्हें तें ठेविलें आहे. त्याजवरी काय कानजी नाईकीं संदेह चित्तांत आणिला हें न कळे. बायकोस जिवें मारिलें. ते वख्तीं किले सिंहगडीं किलेदार होता त्यास वर्तमान जाहीर झालें. तेव्हां किले मजकुरीहून स्वारी येऊन कानजी नाईकास कैद करून नेऊन अटकेंत ठेविलें. तेव्हां खुनाचा खंड होन १०० शंभर एकरों बांधला घ्यावयास अवकाश नाहीं. तेव्हां हातापायाचीं नखें व शिंपन्या काढल्या. अंगास किन्ही पडली, त्यास मुतें पडलीं. हाल फार

झाले. तेव्हां नाईकवाडी आपल्या वडिलांकडे आले, आणि म्हणों लागले कीं, तुम्हीं देशमुखास सोडवणे. त्यास खंडोजी पाटील व शंकराजी पाटील बोलिले जे, गांव मातुश्री आईसाहेबांचा, येथें तुमचा कांहीं दाखला नाहीं. कुल हक्कदक आईसाहेबांकडे त्यांत त्यांचा कमाविसदार गांवांत आहे. आम्हीं सोडविलीयानें आईसाहेब आमचे हातपाय तोडितील. जनावराबर थोडाबहुत हात लावूं. त्यास तो रागेंच उठोन गेला, आणि सिद्धीस सांगितलें कीं, देशमुखीचा हक्क पाटील खातो त्यास धरून आणून पारिपत्य करावें. म्हणजे देशमुख सुटेल. त्याउपरी सिद्धी बोलला जे, पांचजण शिपाई घेऊन जाऊन घेऊन येणें. त्यास नाईकवाडी बोलिला जे, तो चाळीसपन्नासांच्या हातास लागेना. त्याच्या वाडियांत कुत्रे चार ४ आहेत ते चार वाघच आहेत. त्याउपरी त्यांनीं पाळत लाविली. तो खंडोजी पाटील देवळीं नवरात्रीं बैसला होता. तेव्हां तिसरे माळेस जपून स्वारी तयार किल्ले सिंव्हगडीं झाली; तेव्हां आपणास आमचे वोळखदेख होते त्यांनीं माणूस पाठविलें कीं, स्वारी तुह्मांवर देशमुखांनीं पाठविली, तुह्मीं काठी आड करणें. तेव्हां मध्यरात्रीस माणूस आले. तों देवाच्या तिन्ही माळा उतरून व मुखवटे उतरून मुलेंमाणसें सडी घेऊन वाडियास गेले. तों मागें स्वारी घरावरी व देवळावरी आली, वेढा घातला. देवळांत पाहूं लागले तों पाटील नाहीं. तेव्हां गांवीच्या महारास आणून पुसों लागले जे, पाटील काय झाला ? तेव्हां त्यानें हकिकत सांगितली कीं, तुमची स्वारी येत हे उबले ऐकोन ते अवशीच निघोन गेले. तेव्हां घरावर लगट केला. तो कुतरी स्वारीस अलंगो देईनात. तेव्हां मागती माणूस आले कीं, तुह्मीं लौकर निघणें. त्यावरी मौजे पांडे नजिक शिरवळ येथें उजेडतां गेले. मागें उन्हें पडलीयावरी स्वारीनें कुतरीयांस गोळ्या घालून मारिलें. आणि घरदार बिशाद लुटिली. सरकारचें कोठार आपले ताबीज होतें तेंही लुटिलें. सारी मवेशी नेली. त्याउपरी तिसरे दिवशीं घरीं खणिलें. तेव्हां देव्हारीयाचे व चुलीचे आडभिंतींत होनाचा व फ़ायद-पत्राचा हंडा पुरीला होता, तोही काढिला. आणि देशपांडे मोरो बल्लाळ याच्या वडिलांच्या गुजारतीनें कुल मवेशी व कागदपत्र घेऊन गेले. त्याउपरी आपला वडील खंडोजी पाटील हा धाय घेऊन मेला. मागून कौल करार कोणी धाल तो न दिल्हा. शंकराजी पाटील परागंदा झाला. त्यास हा काळपर्यंत देवळीं घट मुद्दा बसतो, माळ पडत नाहीं. आह्मीं देवावरी माळ घालितों, घट बसवीत नाहीं. येणेंप्रमाणें करीना पांढरीस पुसावा. सदरहूप्रमाणें करिना देशपांडियाच्या मुखें व भोंवर गांवच्या मुखें व सरपाटील मल्हारजी ढिमका याच्या मुखें खरा करून देऊं. जर ते देशमुखाचे भिडेनें सांगेनात तरी ही तकरीद आपले मस्तकीं बांधोन दिव्य रवा काढूं. ते वेळेस मातुश्री आईसाहेब शिवनेरीस होती. धणी कोणी नाहीं परागंदा झालों. मग काळदुष्काळानें मेली गेली. हे तकरीर सही येणेंप्रमाणें भगवंतराव महादेव देशकुळकर्णी तर्फ मोसेखोरें यांच्या दस्तुरचा लेहून दिल्हीस. त्यावरी देशमुखमजकूर यानें तकरीर दिल्ही. बितपशील:—

तकरीर कर्दे बेशमी पिराजी नाईक कोंडे देशमुख, तर्फ खेडेबारें व पाटील मौजे कामथडी तर्फ मजकूर सुरुसन इहिदे आर्बैन मया व अलफ. साहेबांचे शेवेसी करिना लेहून दिल्हा ऐसाजे, मौजे मजकुरची पाटिलकी आपली म्हणवून हिरोजी इंगुलकर साहेबापाशीं फिर्याद झाला. त्यावरून साहेबीं आपल्यास हुजूर आणून आज्ञा केली कीं, ये गोष्टीचा करिना कैसा आहे तो लेहून देणें. ऐशियास तर्फ मजकुरी आमच्या पाटिलकीया देखील माऊबंद गांव पुरातन आहेत. त्यास आपले वडील बोपजी व जाखोजी नाईक यांचे वेळेस कारकिर्दी मलिकअंबर ते समयी बोपजीचे लेक हरजी, मुलजी व जाखोजी यांनीं देशमुखीचे गांव व पाटिलकीचे गांव वांटून घेतले. तेव्हां मौजे मजकुरची पाटिलकी जाखोजीचे वांटणीस आली. त्यांनीं खादली. पुढें जाखोजीनें कांहीं कसालीयामुळें मुसलमानास विकिली. त्याचें नांव अल्लीभाई बहिलीम त्याचा लेक, सुलतान पाटील त्याचा लेक वली पाटील, वलीचा लेक हली बावाजी ऐसे चार पुरुष मुसलमान खात आहेत. पलीकडे आपले वडील जाखोजीनें पाटिलकी खादली. त्यापलीकडे आपले वडील कोंडे बोपजी व जाखोजीचे वडील खात आले. पाटिलकी पुरातन आपली. बारा गांवचे चाळीस गांव जाहले तेव्हांपासून आपल्या कुळाकडे पाटिलकी आहे. याप्रमाणें खात असों. दरम्यान कजिया कोणाचा झाला नाहीं. ऐकिला नाहीं. पाटिलकी आपली खरी. आपल्या वडिलीं बहिलीम मुसलमान अल्लीभाई यास विकली. त्याचा वंश खात आहे, हें खरें, हा करिना लेहून दिल्हा सही छ २९ रजब वि॥ कलम महिपत जगन्नाथ गोवड कुळकर्णी मौजे मजकूर येणेंप्रमाणें पिराजी मजकूर यानें तकरीर दिल्ही. यावर जमानाविषयीं आज्ञा केली. तेव्हां जमान हरदोजणांचे छ २९ रजबी सन इहिदे आर्बैनांत घेतले, बितपशील:—

तुंवा जमान भगवंतराव महादेव देशकुळकर्णी तर्फ मोसेखोरें यास हजीर जमान दिल्हे त्याचा जमान कतबा. कलम १.

पिराजी मजकूर यानें बहिरजी बिन बाळाजी सिलिवकर देशमुख तर्फ गुंजणमावळ यास वर्तावयाचा जमान दिल्हे त्याचा कतबा. कलम १.

येणेंप्रमाणें जमानकतबे घेतलीयावरी मनास आणून हरदोजणास पुरसीस केली कीं, कोणत्या इनसाफास राजी तें सांगणें. तेव्हां तुंवा विदित केलें कीं, माझ्या वतनाशी कजिया देशमुख सांगतात. गोहीदारास त्याचा शह आहे. त्याहीमध्यें येणेंप्रमाणें गोहीदार हुजूर आणून त्यास सत्य घालून पुसावें. त्याचे साक्षीस आपण राजी असों. ह्मणोन राजी झालास. तेव्हां आज्ञा केली, कोणते मोहीदार ते नांवनिशीवार लेहून देणें, आणविले जातील. आणि ते सांगतील त्याप्रमाणें ऐको, ऐसा राजीनामा लेहून देणें. त्यावरून तुंवा राजीनामा लेहून दिल्हा. बितपशील:—

वेशमी हिरोजी इंगुलकर सुरुसन इहिदे आर्बेन मया अलफ शेवेसी राजीनामा लेहून दिल्हा ऐसाजे, येणेंप्रमाणें नांवनिशीवार गोत सांगेल त्यास राजी असों. असामी वितपशील:--

मौजे मजकुरचे वतनदार.

१ वलबोजी वाल्हेकर चौगुला.
१ खंडोजी वाल्हेकर चौगुला.
१ खंडभट जोशी.
१ खंडोजी परीट.
१ चांभार.
३ महार.
  १ खंडनाक थोरला.
  १ खंडनाक धाकटा.
  १ भागी महार.
  ―
  ३
१ मांग.
―
९

तर्फ मजकूरचे नांवनिशीवार वतनदार.

१ मोरो बल्लाळ देशपांडे याचा लेक राघो मोरेश्वर.
१ मल्हारजी पाटील डिमका मौजे शिवरें.
―
२

येणेंप्रमाणें अकराजण हे सत्य स्मरोन सांगतील त्यास राजी असों. यांतील एकजण न आला तर आपण राजी नाहीं. सदरहूप्रमाणें आले तर राजी असों. छ १० साबान राजीनामा शही येणेंप्रमाणे. तुवा राजीनामा लेहून दिल्ही-यावर पिराजीस पुरशीस केली कीं, हिरोजी इंगुलकर सदरहु अकराजण गोहीवाराचे साक्षीस राजी होऊन राजीनामा लेहून दिल्हा. त्यास त्याप्रमाणें तूं राजी होत असि-लास तरी राजी होऊन राजीनामा लेहून देणें. तेव्हां त्यानें विदित केलें कीं, हिरोजीनें जे अकराजण लेहून दिल्हे ते व आणखी भोवर गांवींचे पांचा गांवींचे पांच पाटील एकूण सोळाजण आणवावे त्यास राजी असों. ह्मणोन पिराजी मजकूर यानें राजीनामा छ १४ साबानीं दिल्हा नांवनिशीवार--

११ इंगुलकरानें लेहून दिल्हें तें.
५ भोवरगांवींचे पाटील.
  १ गंगाजी पाटील नोरगा मौजे करंदी.
  १ रामजी पाटील लेफवळे मौजे देगांव.
  १ नाकाजी अथवा दुल्लाजी पाटील राजाणे मौजे खडकी.
  १ उबाजी पाटील सुरवड मौजे उंबरें.
  १ महादजी पाटील मांडे मौजे हरपंढी.
  ―
  ५

येणेंप्रमाणें आणवून त्याचे साक्षीनें सत्यपूर्वक निर्वाह होईल त्यास राजी असो. म्हणोन राजीनामा पिराजी मजकूर याने दिल्हा. त्यावरून मनास आणून सदरहूप्रमाणें नावनिशीवार जिल्हेकडून आणविले ते हुजूर आले. पुढे निर्वाह करावा तों पिराजी मजकूर याने अर्ज केला की, आपली स्त्री मृत्यु पावली, दुसरे लग्न होणे आहे, नेमस्त केलें आहे, लग्नास जावयास आज्ञा व्हावी तेव्हा त्यास निरोप दिल्हा. म्हणून सदरहु गोतासही माघारे जावयास आज्ञा दिल्ही. लग्न झालीयावर पिराजी नाईक यानें गावें, तो आला नाही. मग पुन्हा जिल्हेकडून तलब करून हुजूर आणविला. आणि हरदोजणास पुरशीस केली कीं, कोणत्या इनसाफास राजी असाल ते विदित करणें, त्यास तुंवा विदित केले की, आपण पेशाजी नावनिशीवार गोत लेहून दिल्हे आहे त्याचे साक्षीस रजावद आहे. त्या उपरी हुजूर कयास केला की, देशमुखाच्या शहमुळें गोही साक्षमुळें निर्वाह होता दिसत नाही. यास्तव इगुलकराने रवा दिव्य करावें. खरा जाहला तर वतन अनभवील. खोटा जाला तर वतनास सबंध नाही ऐसा स्वामींनी निश्चय केला. आणि हरदोजणास येणेंप्रमाणे आज्ञा केली. त्यास तुवा मान्य केले व पिराजीनेंही मान्य केलें की, हिरोजी इगुलकर याने दिव्य करून खरा जाहला तर पाटिलकी सुखरूप अनभवावी. आपणास व मुसलमानास सबंध नाहीं. मुसलमानाची समजाविश आपण करू. येणेंप्रमाणे करार हरदोजणाच्या राजीपणे केला. तेव्हा राजीनामे दिव्याचे लेहून घेणे आणि दिव्यामुळें खरा खोटीयाचे वर्तावयाचे जमान देणें म्हणून आज्ञा केली. त्यावरून हरदोजणानी पेशजीचे जमान खरे करून दिल्हे की, दिव्यामुळें जो निर्वाह होईल त्याप्रमाणे वर्तवू. त्यावर राजीनामा दिव्याचा तुवा दिल्हा

दस्तक बेशमी हिरोजी इगुलकर सुरुसन इसन्ने अर्बैन मया अलफ. मौजे कामथडी, तर्फ खेडेबारे येथील पाटिलकी कामथी याची, त्यास ते आपल्या वडिलाचे अजोळ, त्याने आपल्या वडिलास वतन दिल्हे आहे त्याचा भोगवटा जाहला. नावनिशी बितपशील:—

संताजी कामथा यानें आपला निपणजा मल्हारजी पाटील यास वतन दिल्हे त्यांनें अनभविलें १.
भिकाजी बिन शकराजी याचा भोगवटा राहिला १.
शिवाजी बिन भिकाजी याचा भोगवटा नाही १.
हल्लीं हिरोजी बिन शिवाजी आपण याद सागत असोन १.

त्याउपरी खडोजी बिन मल्हारजी याने वतन अनभविलें.

१ त्या उपरी शकराजी बिन खडोजी यानें वतन अनभविलें. मग परागदा जाहला अजी. सबब कानजी नाईक कोंडे देशमुख तर्फ मजकूर यानें काहीं बदअमली केली होती त्याजबद्दल फिर्ज शिद्दगडी शिद्दी रिसेदार होता त्याने बंदी ठेविले. त्यास आपले वडील भाग्यवान होते. त्याची चहाडी दिवाणात केली. रात्री किल्याहून आली त्यामुळें परागदा जाहले पुरुष तीन, तिसरे दोहींत आपण दर्गीर जाहलो १.

येणेंप्रमाणें करिना आहे. या गोष्टी रवीयाचे वेळेस वदोन रवा काढूं. रवीयामुळें खरा जाहलों तर वतन अनभवू खोटा झालो तर वतनास समध नाही. दिवाणाची गुन्हेगारी देऊं हे लेहून दिल्हे सही छ १६ माहे साबान. येणेंप्रमाणे तुवा राजीनामा लेहून दिल्हीयावर पिराजी मजकूर यास पुरशीस केली की, हिरोजी मजकूर याने उचारपूर्वक रवा करीन ऐसें राजीनामीयात लेहून दिल्हे त्यास राजी असशील तर तेणेंप्रमाणे राजीनामा देणे. तेव्हा पिराजी मजकूर यानेंही कबूल करून राजीनामा दिल्हा. दस्तक बेशमी पिराजी नाईक कोडे देशमुख, तर्फ खेडेंबारे व पाटील मौजे कामथडी, तर्फ मजकूर सुरुसन इसन्ने आर्बैन मया अलफ हिरोजीने राजीनामा लेहून दिल्हा आहे त्याप्रमाणे उचार करून रवा काढावा आपण रजावंद असों. हा राजीनामा सही छ १६ साबान. येणेंप्रमाणें हरदोजणानी राजीनामे लेहून दिल्हीयावर हुजरून मौजे पाली येथे श्री————यासी रवा दिव्य करावें ऐसा करार करोन तेथील पारपत्यगार यास राजश्री श्रीनिवास पडित प्रतिनिधि याचे पत्र देविलें, व त्यानी बाळाजी महादेव सुमाचे कारकून दिल्हे व जिल्हेकडील बाळाजी दादाजीस पाठविलें व हुजरून हुजरे सताजी बोरकर व जोत्याजी शिंदा व बाबाजी ताम्था ऐसे इसफल देऊन पालीस हरदोजणास रवाना करणे, म्हणून रघू राजिवडा कलमबारदार यास आज्ञा केली. तेव्हा पिराजी मजकूर याने बिवाजी कोडे याजकडून विदित केले की, आपणाजवळ एक कागद पुरातन आहे तो मनास आणावा ह्मणून कागद दाखविला तेव्हा स्वामीनी आज्ञा केली की, अजि बारा वर्षे जाहलीं वेव्हार पडिला आहे. कागदपत्र येथून मागे नाही ह्मणत होता आणि आता इगुलकर दिव्यास तयार जाहला, आता कागद दाखविता तर ठेवणे. जें होणें तें दिव्यामुळें होईल. त्यावर पिराजी मजकूर याने बोली घातली की, याउपरी दिव्य राहवावें. निमे पाटिलकी इंगुलकरास देतों. हे वर्तमान स्वामीस विदित जाहलें. त्यावरून तुजला येविषयीं आज्ञा केली की, निमे वतन देतात घेऊन समजणे. तेव्हा तुवा हुजूर अर्ज केला की, आपण अजि बारा तेरा वर्षे वेव्हार सागतो खराब जाहलो. मागे समजाविश केली नाही. रवा काढावयास सिद्ध जाहलों; आता निमे देतात, त्यास आता घ्यावेंसे नाही रवामुळें खरा झालों तर अगदीच वतन अनभवीन. नाहीतर देशावर जाईन. मातुश्री जिजाऊसाहेबाचा सरदेशमुखीचा इसाफती गाव, तेथें देशमुख, देशपांडे याचा हक्क नाही. म्हणून माझ्या वडिलास यानीं मार्गे परागदा केले. आता दिव्य करीन. दिव्यामुळेंच जे होणे तें होईल. ऐसा तुवा अर्ज केला. तेव्हा तुझा करार देखोन दिव्यास हरदोजणास सदरहूप्रमाणे बराबर देऊन पाठविलें. तेथे गेलीयावर साहा दिवस मुकाम जाहला. तेव्हा तेथील पद्धतप्रमाणें समस्तानीं बैसोन आश्विन वद्य एकादशी, मदवारी छ २४ साबान, सन इसन्ने आर्बैन मया अलफ ये दिवशी तुझे हात साबणाने धोवून चिन्हें हातची लेहून हातास पिशवी घालून लाखोटा करून चौकी देऊन ठेविलें. दुसरे दिवशी छ २५ साबान, रविवारी, आश्विन वद्य द्वादशीस पद्धत-

प्रमाणें शास्त्रसंमतें समस्तांनीं श्रीचे देवळीं बसोन तेल, तूप एकत्र करून, ताऊन, तुज-कडून उद्धार करविला. त्याचें चिरपत्र तुझें माथा बांधिलें जे, संताजी कामथा याची मौजे कामथडीची पाटिलकी. त्यास पुत्रसंतान नाहीं. त्यानें लेकीस व जावई मल्हारजी इंगूलकर या दोघांस संताजीनें आपण पाटिलकी दिल्ही. मल्हारजी आपला वडील; त्याचा, वंश आपण हें सत्य, ऐसा उच्चार करून रवा कहाडिला. त्याजवर तुझ्या हातास पिशवी घालून लाखोटा करून ते दिवशीं तेथेंच ठेविलें. दुसरे दिवशीं तुजला व पिराजीस हुजरे घेऊन हुजूर आले. त्यावरी स्वामीसंनिध जिल्हेदारांनीं हरदूजणास आणिलें. तुझें हातचा लाखोटा राजश्री कृष्णाजी त्र्यंबक जिल्हेकडील यांजकडून फोडविला. पिशवी काहाडून हाताची चौकशी बरें रेवसीनें सभेकडून करविली. समस्तांनीं हात पाहिला. उत्तम हात निघाला. त्यावरी पिराजी मजकूर यास हात दाखविला. त्यानेंही चौकशीनें पाहून विदित केलें कीं, हात उत्तम; कांहीं लांछन नाहीं. हिरोजी पाटील इंगूलकर दिव्यास खरा उतरला, ऐसें बोलिला. तेव्हां मागती आज्ञा केली कीं, पुर्ती चौकशी करून त्रिवार काय तें बोलणें. तेव्हां पिराजी मजकूर त्रिवार बोलिला कीं, हिरोजी पाटील इंगूलकर दिव्यास खरा जाहला आपण खोटा जाहलों. मौजे कामथडीची पाटिलकी याची खरी; तरी त्याची पाटिलकी त्याचे हवाला करणें. आपण खोटा जाहलों. याउपरी आपल्यास व मुसलमानास मौजे मजकूरचे पाटिलकीशीं संमंध नाहीं. मुसलमानाची समजाविश आपण करूं. याप्रमाणें सभास्थानीं पिरा-जीनें विदित केलें व सभा मंडळीनींही विदित केलें कीं, इंगूलकर खरा जाहला व स्वामींनींही तुझा हात पाहिला, उत्तम निघाला. खरा झालास ऐसें जाणून, तुजला हुजरून शिरपाव दिल्हा आणि पिराजीकडून व मुसलमानाकडून येजितखतें देविलीं. तीं त्यांनीं अलाहिदा आपले रजावंदीनें दिल्हीं असेत. व पिराजी मजकूर याचा जमान बहिरजी नाईक सिलीव-कर याजकडून तुजला येजित पत्र देविलें कीं, पुढें काळकला मुसलमान अगर कोडे यांनीं कजिया केलाच, तरी आपण त्यास आपलें वतन देऊं. तुझांसी क-जिया करावयास संमंध नाहीं. येणेंप्रमाणें तिघांचीं येजित पत्रें देविलीं. त्याजवरी मुस-लमानास पुरशीस केली की, तुजला देशमुखांनीं पाटिलकी विकत दिल्ही ऐसें हाणत होतास, त्याचे कागदपत्र जे असतील ते हजीर करणें. तेव्हां त्यानें अर्ज केला कीं, कागदपत्र होते ते, घर जळालें तेव्हां जळाले. ऐसी शपथ केली; तेव्हां त्यास मुक्त केलें. काळकला कागदपत्र त्याजपाशीं निघाले तर ते रद्द असेत. व पिराजी मजकूर यानें पेशजी दिव्यास जाते समयीं कागद काढिला होता, तो आणवून फाडविला. काळकला त्याजपाशीं कागद असीला तर रद्द असे. येणेंप्रमाणें दिव्हे लागलीयावर मौजे पाली येथील दिव्याचें जयपत्र तेथील वतनदारानें साक्षीनिशीं तुजला त्यांनीं दिल्हें आहे. तेंही अलाहिदा तुजपाशीं आहे. तर सदरहूप्रमाणें पिराजी मजकूर व मुसलमान खोटा जाहला. त्यास मौजे मजकूरचे पाटिल-कीशीं संमंध नाहीं. तूं तकरिरेप्रमाणें दिव्यामुळें खरा जाहलास याजवरून तुजवर स्वामीं

कृपाळू होऊन मौजे मजकुरचें पाटिलकीचें वतन तुझे दुमाला वंशपरंपरेनें केलें असे. आणि हें वतनपत्र तुजला सादर केलें असे. तरी मौजे मजकुरच्या पाटिलकीच्या वतनाची सेवा दंडकप्रमाणें करीत जाणें. वतनसंबंधें हक्क लाजिमा, मानपान, इनाम पासोडी व बाजे उत्पन्न काळी व पांढरीचे सुदामतप्रमाणें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवून सुखरूप राहणें. या वतनसंबंधें तुझ्या माथां जीवनमाफीक शेरणी दुतर्फा रुपये ५०० पांचशें करार करून वसूल हुजूर घेतला असे. कीर्दीस बार छ ९ रजब, पत्रें आषाढ शुद्ध द्वितीया, सौम्यवासरे, शके ६१ दुंदुभीनाम संवत्सरें, चिटणिशी ( पत्रें ).

१ वतनपत्र.
१ देशमुख व देशपांडे.
१ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी.
१ राजश्री चिमणाजी नारायण सचीव.
—
४

---

## वतनपत्र ७.

जानोजी बिन हिरोजी इंदुलकर पाटील, तिसरी तकशीम वडीलपण तर्फ इंदुलकर, मौजे करंजे, तर्फ सातारा, परगणे मजकूर हुजूरं शाहूनगर नजीक किल्ले मजकूर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, इंदुलकर तर्फ मजकूरची तिसरी तक्षीम पाटिलकी वडीलपण संभाजी बिन अंतोजी इंदुलकर याचें वतन. त्यास संभाजी पाटील यास गोसावी यांचें कर्ज जाहलें. सुलेंमाणसें गोसावी याचे बंदीं पडलीं. तो वृद्ध अशक्त जाहला. वतन हर कोणास विकून मुलें, माणसें सोडवावीं, याअर्थें रायगडारा आला, आणि थोरले कैलासवासी राजश्री स्वामीं यासंन्निध अर्ज केला जे, कर्जानिमित्य आपली तक्षीम विकतों. कोणी घेईल त्यास देतों. त्यावरून आपले बाप हिरोजी इंदुलकर राजश्री स्वामींसंन्निध सेवा करून होते. त्याला आज्ञा राजश्री स्वामींनीं केली कीं, वतन तुम्हांस पाहिजेसें असेल तरी विकत घेणें. त्यावरून इंदुलकर तर्फ मौजे मजकूर चावर १५ पैकीं आप्पाजी बिन बापूजी चावर ५ व हणगोजी बिन आप्पाजी चावर ५ एकूण दाहा चावर दोनी तक्षीमीचे भाऊ सवंत्र आहेत. बाकी पांच चावर पाटिलकी वडीलपण संभाजीचे, आपला बाप हिरोजी इंदुलकर यानें विकत घेतलें. संभाजीचे कर्जदारास राजश्री स्वामींसंन्निध होन दिल्हे, बितपशील—

| हणवंतगीर | भद्रगीरी | साना नाईकवाडी याचे घोडीबाबत कजिया |
|---|---|---|
| २०० | ३०० | माणकोजी बिन दुळबाजी इंदुलकर २१७. |

एकूण सातशेंसत्रा देऊन संभाजीची तक्षीम विकत घेतली. दिवाणाने कागदपत्र शेरणी देऊन घेतले व गांवारा येऊन, गोतास जेवण करून, वस्त्रें गांवकऱ्यांस व देशक यास दिल्हीं आणि महजर करून घेतले. त्याप्रमाणें वतन अनभवीत आलों. त्याउपरी महाराज राजश्री

शिवाजी राजे यांची इतराजी हिरोजी इंदुलकर आपले बाप यावरी होऊन मौजे आरे तर्फ परळी येथें मारिले. घर दिवाणांत केद केलें. तेव्हां वतनाचें कागदपत्र होते ते गेले. आपण ते समयीं दाहा दिवसांचा होतों. मोगलाई जाहली. धामधुमीचा प्रसंग. मुतालीक वतनावरी होता तोही देशावरी येला. आपली आई मौजे दवडज तर्फ निरथडी येथें जाऊन राहिली. करंज्याच्या वतनावर हसाजी पाटील व संभाजीचा धाकटा भाऊ आमची तिसरी तक्षीम व वडीलपण करीत होता. त्यास स्वामी खेडकडुसाहून फत्ते करून साताऱ्यास वेढा घातला, ते प्रसंगीं हसाजी गडावरी चाकरीस होता. त्यास तो गोळी लागून मृत्य पावला. आपले कोणी वतनावरी नव्हते. येसजी बिन आप्पाजी पाटील आमची तक्षीम करूं लागला. त्याउपरी पांच सात वर्षानें आपण मौजे मजकुरास आलों. आपली तक्षीम करूं लागलों. त्या वडीलपणाच्या फाइयास कजिया केला, परंतु त्यांनीं रेटाई करून आपलें चालों दिल्हें नाही. आपलें वडीलपण खरें आहे. मुतालीक विभापा वतन चालवीत होता. तेव्हां भोगवटा आहे. त्याउपरी हसाजी इंदुलकर त्याजप्रमाणें करीत आला. मुतालिकाजवळ वतन खरीदी केलें. ते समयींचा एक कागद साक्षपत्र सुभेदार व हवालदार व देशक यांच्या शिक्क्यानिशीं व निम्बेचे भाऊ कीरदंत व कुळकर्णी व चौगुले व बलुते व शिवथडे पाटील यांचे साक्षीनिशीं पत्र आहे, तें आपण तलास करून आणिलें आहे. तें मनास आणून भोगवटा पाहून आपले वडीलपणाचे फाइदे आपल्या दुमाला केले पाहिजे ह्मणोन विदित केलें व साक्षपत्र आणून दाखविलें. त्यास भोगवटा मनास आणितां तिसरी तक्षीम संभाजी बिन अंतोजी इंदुलकर याचें वडीलपण देखील खरें; त्यानें आपले संतोषें हिरोजी इंदुलकर यास विकत दिल्हें. हें खरेंखुरें ऐसें कळों आले. त्यावरून तिसरी तक्षीम पाटिलकी वडीलपण तश्रीफ नांव नागर व होळीची पोळी, देऊळचा घट, वाल वाजंतर व महार व सेवाधार व बाजे कानूकायदे तुझे दुमाला केले असत. येसजी इंदुलकर यास वडीलपणाशीं संमंध नाहीं. सदरहू तिसरी तक्षीम पाटिलकी वडीलपण तूं आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवून दंडकप्रमाणे वतनाची सेवा करून सुखरूप रहाणें. या वतनसंबंधें तुझे माथां शेरणी हुतर्फा रुपये २०० दोनशें करार केले असेत. त्याचा वसूल हुजूर जाहला असे. छ २२ रमजान, शके ७० हविरोद्धारी संवत्सरे, सन आर्बा आर्बेन मया अलफ. पत्रें चिटणिशी. कार्तिक शुद्ध नवमी, भृगुवासर हेविषयीं.

१ मुख्य पत्र.
१ देशमुख व देशपांडे.
१ देशाधिकारी.
१ मौजे करंजें तर्फ मजकूर.

४

## वतनपत्र ८.

बावाखान बिन इस्मालखान गोरी निमे मोकदम वडील तर्फ मौजे कात्रज, तर्फ कर्यात मावळ याजमध्ये व पोलादशाहा बिन नूरशाहा सैद याजमध्ये मौजे मजकुरचे सदरहू निमे मोकदमीचा कजिया लागला होता. याजकरिता पोलादशाहा सैद सन इहिंदे अर्बैन या सालात जिल्हेकडे फिर्याद झाला की, मौजे मजकुरची निमे मोकदमी वडील तर्फ आपली, त्यास आपली वडील साखराई सैदीण इने वतन अनभविले तिचा वंश आपण आहो. पुस्त दरपुस्त आपले वडील, वडील वतन अनभवीत आले असता, ये आमदानीस बावाखान गोरी आपणासी कजिया करतो त्यास आणवून त्याचा व आपला फारिना मनास आणून बरहक इनसाफ केला पाहिजे त्यावरून पंडित मशारनिल्हेनी बावाखान याजला तलब करून हुजूर आणून येथाचे पुरशीस केली, तेव्हा यानी आपले वर्तमान जाहीर केले की, मौजे मजकुरची दरोबस्त मुकदमीचें वतन गोरी मुसलमान आपले वडील वडील त्याचे त्यास निमे मोकदमी धाकटी तर्फ इचा खावद आलाहिदा आहे. निमे मोकदमी वडील तर्फेचा खावद आपण आहो. आपले वडील वडील खात आले त्यास आपला वडील मिराजी बिन मीयाजी गोरी व त्याची औरत साखराई गोरी ही वडील व मिराजीचा सख्खा धाकटा भाऊ हुसेन गोरी त्याचा वंश आपण, त्यास मिराजीचे नक्कल झाले. मिराजीचे व त्याचे मागे साखराईने पाटिलकी केली. त्याचे मागे आपला वडील हुसेन गोरी याने व त्याच्या वंशाने निमे मोकदमी वडीलपण वडीलतर्फेचे वतन अनुभाविले. त्याप्रमाणे आपले वतन गोरीचे खरें, सैदाचे नव्हे पोलादशाहा सैद यासी काहीं वतनासी संबंध नाही. तो झोंडपणे भळा पडतो. तरी याची चौकशी करून बरहक इनसाफ केला पाहिजे म्हणवून बावाखान गोरी याने जाहीर केले. त्यावरून सदरहूप्रमाणे दोघाच्याही तकरिरा व कतबे पंडितमशारनिल्हेनी घेतले व जमान मागितले. त्यावरून हरदोजणानी सन इहिंदेत जमान दिल्हे. बितपशील:—

पोलादशाहा याने जमान मलिक पाटील मुसलमान कसबे खेड शिवापूर, तर्फ खेडेंबारे यासी दिल्हे बरहुकूम कतबा. छ १७ जमादिलाखर १.

बावाखान याने जमान रहिमान व दावजी तुपे देसाई व मोकदम मौजे कडधें, तर्फ पौनमावळ यासी दिल्हे कतबा. छ ४ रमजान १.

येणेप्रमाणें जमान कतबे जिल्हेकडे दिल्हे. त्यावरी याची चौकशी मनास आणावयाकरिता मौजे मजकुरचे वतनदार, थळकरी व बलुते व तुलाव पंडित मशारनिल्हेनीं हुजूर आणवून येथाचे त्यास पुरसिसा पृथकाकारें नावनिशीवार करून पूर्वील कैफियत कैशी आहे ते लेहून देणे ऐसे पुसोन त्यानी सांगितल्याप्रमाणे त्याचे फारिनें लेहून घेतले. त्याची चौकशी मनास आणिता उिकाण न लागेसे जाहलें, व कागदपत्र पूर्वील दो(हो) वादीयाकडे

असतील ते आणविले. त्यास राजश्री दादोजी कोंडदेव याचे कारकिर्दीचा महजर मौजे मजकुरचे मोकद्दमीचा होता तो आणविला. तो बावाखान यांनीं आणून दाखविला. तो पाहतां, त्यांत अर्थ कीं, मुसलमानाचें मोकद्दमीचें वतन खरें; त्यास दोघे भाऊपणीयांत भांडों लागले ह्मणवून दोघांस दोन तर्फा निमेनिम करून दिल्हा आहेत. नांवें मात्र दोघांचीं लिहिलीं आहेत, यामुळें सैद किंवा गोरी हें ठिकाण लागेना. भोगवटा पूर्वील मनास आणितां पांढरींतील गोही साक्षमुळें साखराईनें पाटिलकी केली आहे, तिचा दाखला पुरला. परंतु साखराई सैदीण किंवा गोरी हें ठिकाण गोही साक्षमुळें अगर कागदपत्रामुळें लागेनासें जाहलें. तेव्हां सदरहू वर्तमान सालमजकुरीं पंडित मशारनिल्हेनीं हुजूर विदित केलें. तें सविस्तर मनास आणितां हरदोजण साखराईचे ह्मणतात ते गोरी किंवा सैदीण हें ठिकाणीं लागत नाहीं. तेव्हां यासी क्रिया दिव्य मशीदीचें रांजणगांवीचें यावें,ऐसा निश्चय करून पंडित मशारनिल्हेस आज्ञा केली कीं, दोघांस रांजणगांवीचे मशीदीचे क्रियेस पाठविणें, तेथून क्रियेमुळें निर्वाह होईल त्याप्रमाणें विल्हे लावणें. त्यावरून पंडित मशारनिल्हेनीं या हरदोजणांस पुरशीस केली; तुमचा कजिया आजि दहा पांच वर्षे पडिला आहे, निवाडा होत नाहीं. याउपरी तुह्मीं क्रिया विश्वास रजावंद होत असाल, तरी राजी होऊन राजीनामे व वर्तावयाचे जामीन देणें, ह्मणजे रांजणगांवास हरदोजणांस पाठवून देऊं; तेथें क्रियेमुळें निर्वाह होईल त्याप्रमाणें वर्तणें. त्यावरून या हरदोजणांहीं निश्चयास राजी झाले आणि राजीनामे लेहून दिल्हे तितपशील.:—

दस्तक बेशमी पोलादशाहा बिन मुरादशाहा सैद, मौजे कात्रज, तर्फ कर्यातमावळ, सुरुसन सलास आर्बैन मया व अलफ. साहेबांचे सेवेसी. राजीनामा लेहून दिल्हा ऐसाजे, बावाखान गोरी याचा व आपला मौजे मजकुरचा पाटिलकीचा कजिया लागला आहे. साखराई हे शाहाबुदीन आपला वडील याची बायको तिचे वंशीचा आपण आहों, ऐसें असोन बावाखान गोरी वगैरे ह्मणतात जे, ते साखराईचा वंश आपण आहों. साखराई गोरी याची बायको ऐसें ह्मणतात. याचा दाखलाही पाहतां ठिकाण लागेना, याकरितां साहेबीं क्रिया नेमिली. त्यास हरदुजण क्रियेस रजावंद जाहलों असों. मशीदीच्या रांजणगांवास जाऊन मशीदीची क्रिया करून

दस्तक बेशमी बावाखान बिन इस्मालखान गोरी, मौजे कात्रज, तर्फ कर्यातमावळ, सुरुसन सलास आर्बैन मया अलफ. साहेबांचे सेवेसी. राजीनामा लेहून दिल्हा ऐसाजे, पोलादशाहा सैद याचा व आमचा मौजे मजकुराचा पाटिलकीचा कजिया आहे. त्यास गोही दाखले पाहतां ठिकाण लागला नाहीं. पहिले गांवीची पाटिलकी साखराईनें केली आहे. तिचें अडनाव गोरी ऐसें आहे. ते साखराईचे वंशीचे गोरी आपण आहों. ऐसें असोन पोलादशाहा ह्मणतो कीं ते साखराई सैदाची आहे. याबदल निवाडा होईना, याजकरितां हल्लीं आपण क्रियेस राजी जाहलों आहों. साहेबीं मशीदीचे रांजणगांवास आह्मांस व पोलादशाहास पाठविलें. हरदोजण

क्रियेस खरा जाहलो तरी सारी पाटिलकी आह्मी खाऊ जरी क्रियेस खोटे जाहलो तरी दरोबस्त पाटिलकी गोरी यानी खावी. आपणास पाटिलकीशी समंध नाही. साखराई पाटलीण हे आपल्या वडिलाची बायको खरी, सैद साव मिराशा आपले चुलते व मीयाजी आपला आजा सैद, हे क्रियेनिशी खरे करून देईन. आपण क्रियेस खरे जाहलो, तरी बावाजी वगैरे गोरी यासी पाटिलकीशी गरज नाही आपण खोटा निघालो तरी आपणास वतनाशी समंध नाही हा कतबा लेहून दिल्हा सही. ताजा कलम:—बावाजी गोरी यानी क्रिया करून खरा जाहला तरी दरोबस्त पाटिलकी गोरी यानी खावी. सैदास पाटिलकीशी समंध नाही आपल्यास वर्तावयासी साहेबापाशी पहिले जमान दिल्हे आहेत. तोच करार आहे. हे लिहिले, सही निशाणी नागर त्रिकलम धोंडो नामदेव लाडे देशपांडीये कर्यातमावळ, छ १२ रबिलाखर राजीनामा १

तेथे जाऊन मशीदीची क्रिया होईल त्याप्रमाणे वर्तणूक करू. जरी पोलादशाहा क्रियेस खरा जाहला आणि आपण गोरी खोटे जाहलो तरी दरोबस्त पाटिलकी पोलादशाहा सैद याने खावी. आपल्यास पाटिलकीशी समंध नाही. साखराई मिराजीची बायको मिराजी व मीयाजी गोरी हे आपले वडील आहेत. त्याचा वंश आपण आहो. ऐसे आपण क्रिया करून खरे करून देऊ आपल्यास क्रिया लागली ह्मणजे दरोबस्त पाटिलकी सैदानी खावी. आपल्यास समंध नाही. हा कतबा लेहून दिल्हा सही. आपलेस वर्तावयासी जमान पहिले कडधाचा पाटीलसाहेबासी दिल्हा आहे तोच करार आहे. हे लिहिले सही. निशाणी नागर त्रिकलम धोंडो नामदेव लाडे देशपांडीये कर्यात मावळ, छ १२ रबिलाखर राजीनामा १.

येणेंप्रमाणे हरदोजणानी राजीनामे व जमान पेशजीचे खरे असत ह्मणून सदरहूप्रमाणें लेहून दिल्हे क्रियेस रजावंद जाहलो असे. त्यावरून हुजूरून राजश्री मोरो नारायण सुभेदार प्रांत कोंडराजणगांव यास आज्ञापत्र खास दस्तूर सहीचे सादर केले की, या हरदोजणापाशीं कसबे राजणगावचे मशीदीची क्रिया घेवविणे खरा खोटा याचें स्थळपत्र हुजूर पाठवणे ह्मणोन हुजूरून बराबर सताजी बोरकर देऊन जिल्हेकडील लोक व पत्रें देऊन राजणगावास दोघास रवाना करविले. हुजूरच्या लोकानीं हरदोजणास सुभा नेले सुभेदार मजकूर याने आपले पत्र सुभाचे लोक देऊन कसबे मजकुरास पाठविलें. तेथील पारिपत्यगार व गावचे वतनदार जमा करून त्यास हुजूरचे आज्ञेचे वर्तमान लोकानीं सांगितलें. यावर आज्ञापत्रावरून कसबे मजकुरचे समस्तानीं बसोन या दोघाच्या राजीपणें स्थळचे पद्धतीप्रमाणे क्रिया बावाखान याजकडून करविली पोलादशाहाने याजपासून क्रिया घेतली पधरा दिवस तेथें मशीदींत हरदोजण ठेऊन हुजूरचे लोकाचे गुजारतीनें जाहलें वर्तमान बावाखान गोरी व पोलादशाहासीं खरें करून त्याची जयपत्रें दोघास देऊन कसबे मजकुरचे

समस्तानी दिल्ही तीं हरदोजणानी घेऊन उपरातिक क्रिया घेतली ह्मणून गावची बखर व सुभाची पत्रे व या हरदोजणा(स) हुजूरच्या लोकानी हुजूर आणिले हरदोजण हुजूर आले दोघाजवळ स्थळची जयपत्रे दोन होतीं, ती दोघानीही हुजूर हाजीर केली तीं छ ६ रजबी मनास आणिलीं बितपशील अस्सलप्रमाणे —

" छत्रपती स्वामी पतसचीवसाहेब "

" जयपत्रे, शके १६६४ दुदुभीनाम सवत्सरे, श्रावण कृष्ण ८ गुरुवासरे ते दिवशी बे हुजूर गोत मोकदम व शेटे महाजन, कसबे राजणगाव, तर्फ मजकूर सरकार जुन्नर, सुरुसन ११५२ या वियमाने अग्रवादे बावाखान वल्लद इस्मालखान गोरी व पश्चमवादी पोलादशाहा वल्लद नूरशाहा सेद, मौजे कात्रज, तर्फ कर्यातमावळ, प्रात मावळ, जयपत्र ऐसेजे, मौजे मजकूरची मुकदमी दरोबस्त मुसलमानाची तर्फा दोन, त्यापैकी निमेचा धाकटा खानाजी गोरी बाकी वडील तर्फ निमे मोकदमी त्याचे हरदोजणात भाडण की, दोघेही ह्मणतात की, साखराईचे वशीचा येबाबेचे वडील तर्फे निमे मोकदमीचे हरदोजणात सातारा महाराज राजश्री———चे दरबारी पडिला त्यास तेथे मजकूर मनास आणता राजदरबारी दिव्य करावयाचा निश्चय जाहला महाराज राजश्री स्वामीनी व राजश्री साहेबी आपलीं पत्रे राजश्री पतसुभेदार साहेबास देऊन मलठणास बरावर हुजरे देऊन पाठविले त्यास मलठणी राजश्री सुभेदार साहेबी सदरहू निवर्ग, सरकारचे लोकासमागमे देऊन पाठविले. त्यास राजश्री साहेबाचे आज्ञापत्री हुकूम केला की, मौजे कात्रज, तर्फ कर्यातमावळ येथील निमे तक्षीम वडीलपणाची, त्यात पोलादशाहा सेद व बावाखान गोरी या दोघात कजिया लागला आहे गोहीसाक्षमुळे निर्वाह होत नाही याकरिता राजश्री स्वामीनी मशीदीची क्रिया नेमून कसबे मजकुरास हरदोजणास पाठविले आहेत येविषयी मोरो नारायण सुभेदार, परगणे मजकूर यासी पत्र सादर आहे त मनास आणून हरदोजण कसबे-मजकुरास पाठवितील तरी समस्त मिळोन पद्धतप्रमाणे क्रिया घेऊन, खरा कोण व खोटा कोण हे लेहून पाठविणे, ह्मणवून राजश्री साहेबी आज्ञापत्र कसबे मजकुरास सादर केले. व राजश्री सुभेदार साहेबी कसबे मजकुरास ताकीदपत्र सादर केले की, मौजे कात्रज, तर्फ कर्यातमावळ, येथील पाटिलीचा कजिया आहे त्यास महाराज राजश्री स्वामी यानी व राजश्री यानी कर्यात मजकुरास दिव्य करावयास पाठविले आहेत तरी याचे वर्तमान मनास आणून, दिन शुद्ध पाहून, श्रीचे दिव्य यापासून तथील पद्धत असेल त्याप्र-माणे घेणे आणि होईल ते वर्तमान बयाजवार हुजूर अर्जदास लेहून पाठविणे येविषयीं दिवसगत न लावणे बहुत जलदीन याचा निर्गम करणे ह्मणोन राजश्री सुभेदार साहेबी पत्र सादर केले त्यावरून मग राजश्री साहेबाच्या हुकुमावरून हरदोजणांसी पुशिले की, तुह्मी श्रीचे क्रियेस रजावद आहात की काय ? त्यास हरदोजण राजी होऊन राजीनामा

लेहून दिल्हा कीं, बावाखान गोरी यानें न्हाऊन धुवून श्रीदिवाची क्रिया करावी. साखराई गोरी आपली वडील, तिचे वंशिक, आपण, तिची अवलाद वडील तर्फेस निमे मोकदमचे खावंद पोलादशाहा सैद याचा कांहीं तालुका नाहीं ह्मणोन श्रीदिवाची क्रिया करून पोलादशाहा सैद याच्या हातीं उदी उचलून देतो. ह्मणोन बावाखान गोरी क्रिया करावयासी राजी जाहला व येणेंप्रमाणें पोलादशाहा सैद बावाखान याजपाशीं क्रिया घ्यावयासी राजी जाहला. राजी जाहलियावरी हरदोजणांस ह्मटलें कीं, श्रीदेवळांत दहा आणि पांच, पंधरा रोज वाती लावून बैसावें लागेल. ज्यास क्रिया लागेल तो खोटा. स्थळ मजकुरची पद्धत पंधरा रोज बैसावयाची आहे. दशरात पंचरात लेहून देणें. त्यास हरदोजणांनीं दशरात पंचरात लेहून दिल्हें कीं, दाहा आणि पांच--पंधरा रोज श्री देवळांत जेणेंप्रमाणें क्रिया करावयाचा निश्चय जाहला आहे, त्याप्रमाणें क्रिया करून, वाती लावून पंधरा रोज श्रीचे देवळांत बैसोन, ज्यास क्रिया न लागे, वतन खाई; ज्यास क्रिया लागेल तो खोटा, वतनासी संमंध नाहीं. ह्मणून हरदोजणीं दशरात पंचरात लेहून ठेवून राजीनाम्याच्या मजकुराप्रमाणें व दशरात पंचरातच्या मजकुराप्रमाणें इस्तकबील, श्रावण शुद्ध ८ गुरुवार तागाईत श्रावण वद्य ८ गुरुवारपावेतों पंधरा दिवसांचा नेम करून, श्री देवाची क्रिया करून, वाती लावून, हरदोजण श्री देवळांत बसले. त्यास रक्षण सरकारचे लोक व कसबे मजकूरचा मुजावर होता. त्यास पंधरा रोज नेम गुजरल्या उपरी दोघां वाद्यांचे रुबरू सैदअली मुजावर कसबे मजकूर यासी बोलावून, सत्य घालून सरकारच्या लोकांविद्यमानें पुरशीस केली. कोणास काय अजमत जाहली ते जाहीर करणें. त्यास मुजावर मजकुरानें हकिकत जाहीर करून लेहून दिधली कीं, पहिले दिवशीं क्रिया केली तेव्हां उदी घेते वेळेस पोलादशाहा सैद कापला. त्याउपरी तिसरे दिवशीं पोलादशाहाचा दिवा जळाला नाहीं. तेल पालथें जाहलें. तीन वख्त दिवा लाविला परंतु लागला नाहीं. बोलचोल दिवा जळाला. रोज आठ बावाखान गोरीचा दिवा चांगला जळाला. त्याउपरी नववे दिवशीं सैदाचा दिवा विझाला. चौदावे पंधरावे दिवशीं पोलादशाहा मुरकुंडी घालून निजला कीं, हींव वाजतें व पंधरावे दिवशीं पोलादशाहाचा दिवा जळाला नाहीं. दिव्यांचे भडके जाहले. येणेंप्रमाणें हकिकत सरकारचे लोक त्रिवर्ग यांचे रुबरू मुजावर मजकुरानें पोलादशाहा सैद यासी श्रीदिवाची अजमत घडली ते जाहीर केली. बावाखान गोरी यासी क्रिया लागली नाहीं. खरा निघाला. त्यास हरदोजणांनी राजीनाम्यांत व दशरात पंचरातींत लेहून दिल्हें आहे कीं, ज्यास क्रिया लागेल तो खोटा, वतनासी संमंध नाहीं. ज्यास क्रिया न लागे तो खरा, त्यानें वतन खावें. त्यास लेहून दिल्हियाप्रमाणें निश्चय केला कीं, बावाखान गोरी श्रीदेवाच्या घरांतून खरा निघाला. त्यानें निमे मोकदमी निमे तक्षीम खावी. पोलादशाहा सैद यासी श्रीदेवाची अजमत जाहली तो खोटा, वतनासी संमंध नाहीं. हें जयपत्र लिहिलें. सही निशाण नांगर निकलम अनाजी यादव जोशी कुळकर्णी कसबे मजकूर.

याप्रमाणें याजपाशीं व पोलादशहापाशीं एकाच मजकुराचीं निवाडीयाचीं जयपत्रें दोन दिल्हीं, तीं दोन्ही मनास आणिता, एकच अर्थ दोहींचा लिहिला त्यात सारांश कीं, पोलादशहा सैद यास क्रिया लागली, खोटा जाहला, त्यास वतनासीं संमध नाहीं. बावाखान गोरी खरा जाहला, त्याने वतन अनभवावे, ऐसें लिहिलें असे तेव्हा पोलादशहा सैद यासी हुजूर पुरशीस केली कीं, क्रिया जाहली, तू खरा जाहलास किंवा खोटा जाहलास? याचें वर्तमान जाहीर करणे तेव्हा त्याने जाहीर केलें कीं, आपणास क्रिया लागोन देवाची अजमत घडली. आपण खोटा जाहलो. याउपरी मौजेमजकूरचे पाटिलकीच्या वतनासी संबध नाहीं. आपला अगर आपले निसबतीच्या सैदास वतनासी संबध नाहीं बावाखान गोरी क्रियेमुळें खरा जाहला त्यास काही अजमत घडली नाहीं गोरीचें वतन खरें, साखराई गोरी खरी. मौजेमजकूरचे मोकदमीचें वतन दरोबस्त गोरीचें खरें जाहलें. त्याचें त्याच्या दुमाला केलें पाहिजे याप्रमाणे हुजूर सभास्थानीं श्रुत केलें, तें मनास आणून बावाखान गोरी यास त्याजकडून आलाहिदा येजितखत देविलें आणि स्थळचें जयपत्र याचें याजकडे देविलें. आणि पोलादशहा सैद खोटा जाहला ह्मणवून त्यास दूर करून, बावाखान गोरी खरा जाहला याजकरिता स्वामी कृपाळू होऊन, जयपत्राप्रमाणें मौजेमजकूरची वडील तर्फ निमे मोकदमीची बावाखान गोरी याची–याच्या दुमाला करून, शिरपाव देऊन वृत्तिपत्र गोरी मजकुरास सादर केलें असे. तरी साखराई गोरीचा वंश बावाखान गोरी, त्यास निमे वडील तर्फेचा मानपान, होळीची पोळी वगैरे उत्पन्न काळीं पाढरीतील हक्क आदा व पालणूक देणे, मागणें. घरें, शेत, मिराशीची इनाम वगैरे जे सुदामतप्रमाणें चालत आलें असेल त्याप्रमाणे बावाखान गोरी यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतन चालवून गावची लावणी उगवणी याचे हातें करून दस्तुरप्रमाणे वतनाची सेवा घेणें पोलादशहा सैद वगैरे सैद यास याउपरी मौजेमजकूरच्या वतनासीं अर्थाअर्थी संबध नाहीं त्यांनें स्थळचें निवाडपत्र आणिलें होतें, तें हुजूर घेतलें असे तें खोटें आहे, तें गोरी मुसलमान याचें वतन दरोबस्त खरें असे या निमे वतनसंबंधें बावाखान गोरी याने माथा जीवन माफिक दुतर्फा शेरणी रुपये ३०० तीनशें करार केले असेत याची उगवणी जिल्हेकडे जाहली असे. या पत्राची प्रती लिहून घेऊन अस्सल पत्र भोगवटीयास परतोन देणें छ—सन ख़मस अर्बेन, पत्रे, वैशाख वद्य तृतीया, सौम्यवासरे, शके ७० रक्ताक्षीनाम संवत्सरे. येणेंप्रमाणें पत्रेः—

१ मुख्यपत्र
१ देशमुख, देशपांडे
१ निमेना मोहदम पत्ताशहा बिन नूरशहा.
१ देशाधिकारी
१ राजश्री पतप्र सैद.

५



## वृत्तिपत्र ९.

दार छ १० मोहरम सन स्द्सास सलासीन.

यादी राजपत्र कृष्णाजी बिन नरसोजी बोडका मोकदम, मौजे गहुजे, तर्फ कर्यात-मावळ, सुम्सन इसन्ने सलासीन मया अलफ दिल्हे वृत्तीपत्र ऐसेजे, मौजेमजकूरची मोकदमी दरोबस्त पुस्तदरपुस्त आपली आहे ऐशीयास दहावीस वर्षे धामधुमेकरिता गाव उजाड पडला होता अलीकडे मोगलाचा खल्ला जाहला ते समयी आपण गावावरी आलो आणि कोल घेऊन वसाहती केली ते समयी सोमाजी बिन बापुजी बोडका आटपडीकडे होते. तेथून मौजेमजकुरास येऊन रयतावियाने कौल घेऊन बोवाडा घातला ते वेळेस आपले व बावाजी बोडका आपले निमेचा धाकटा भाऊ याचे भाऊपणाचे भाडण लागले होते. प्रसगी सोमाजी देशातून येऊन कजिया केला कीं, हे दोघेही धाकटे, आपण दोघाहून वडील आहों, ऐशी तकरीर मौजेमजकूरच्या गोतापाशी केली. त्यावरी राजश्री अनदराऊ बहिरव किले सिंहगडीहून गावास आले आणि हक जव्हारीचे गोत जमा करून, करिना मनास आणिता सोमाजीची वशावळी आपले वशावळीस मिळविली नाही. आपला मूळपुरुष येसजी पाटील त्याचे दोघे, वडील बावाजी त्याचा वश आपण, धाकटा रामजी त्याचा वश हिरोजी व बावाजी हे दोन वश खरे. तिसरा भाऊ आपणास ठाउका नाही. ऐसें आपण लेहून दिल्हे सोमाजीनें लेहून दिल्हे की, मूळपुरुष सोनजी त्याचे पुत्र तिघे वडील कोंडाजी त्याचा वंश आपण, दुसरा बाबाजी त्याचा वश कृष्णाजी, तिसरा रामजी त्याचा वश बावाजी याप्रमाणें वशावळी आहे. ऐशी तकरीर लेहून दिल्ही याउपरी राऊ मशार-निल्हेनी पादरीच्या व भोवरगावीच्या मुखे दाखले मनास आणिता मूळ-पुरुष येसजी पाटील यास लेक दोघे वडील बावाजी व धाकटा रामजी, याचा वश कृष्णाजी व हिरोजी व बावाजी आहेत तिसरा वडील कोंडाजी सोमाजीनें आपला वश लेहून दिल्हा त्याचा थाग लागत नाही ऐसें खरे जाहले त्यावरी गोतास निरोप देऊन राऊ किल्यास आले सोमाजी गावीहून निघोन राजश्री पताजीपत याकडे येऊन, पागेस चाकरी राहून, त्याची पत्रे गडास व जमीदारास घेतली, आणि बरोबर हुजऱ्या घेऊन आला तें पत्रे त्यानी मनास आणिता, वडीलपण व निमे मोकदमी सोमाजीकडे व निमे कृष्णा-जीस देऊन, पत्रे करून देणे ऐसी जोर वजोर हुकूम पत्रे आली तेव्हा आपण गैरहजीर जाला आपले भाऊ गिरजोजी व चाहुजी यासी जोरावारीनें नेऊन, याचा निमे मोकदमीचा कागद लेहून घेऊन, निमे मोकदमी व वडीलपण सोमाजीस देऊन, गोताचा कागद करून दिल्हा. त्याप्रमाणे राजश्री पताजीपत यानीही आपली पत्रे करून दिल्हीं त्या तागा-ईत आपण आज आठ नऊ वर्षे बाहेर पडिलो आहो. सोमाजी मौजेमजकूरची मोकदमी खात आहे. तरी साहेबीं सोमाजीस आणून, गोतमुखें वरहक निवाडा करून आपले वतन आपले दुमाला केले पाहिजे म्हणून तुंबा हुजूर यातारीयाचे मुक्कामी येऊन विदित केलें

साक्ष अगर कागदपत्र नसिला तरी अग्नि दिव्य नेमून द्यावे सांप्रत मौजेमजकूरची समाकुळ पाढरी व देशमुख व देशपांडे व भोवरगावींचे गोत व तर्फ हवेली पुणें येथील गावगन्नाचे गोत हुजूर आले आहेत त्यास शपथपूर्वक पुरशीस करावी आणि गावगन्नाचे पाटील व मौजेमजकूरचे बलुते पृथकाकारें सत्य स्मरोन सांगतील, ते मनास आणून निवाडा करावा सोमाजीस अग्नि दिव्य नेमून द्यावे ऐसे नाही याप्रमाणे मजलसीच्या व गोताच्या विचारें खरें झाले त्यावरून समाकुळ पाढरी व भोवरगावींचे गोत बैसवून, त्यांच्या माथा बेलभंडार घालून, सोमाजीची हकीकत काय असेल ती सत्यपूर्वक बेताळीस स्मरोन विदित करणे त्यावरून पाढरीनें व भोवरगावच्या गोतानें पृथकाकारें सांगितले की, कृष्णाजी व हिरोजी व बावाजी हें वडिलातापाईत मौजेमजकूरची मोकदमी आजीपावेतों अनभवीत आले आहेत सोमाजीचें आदिअवसान आपल्यास ठावके नाही, अगर आपल्या वडिलांनीही काही सांगितले नाही ह्मणून सदरहू गोतानें साक्ष दिल्ही त्याप्रमाणें नावनिशीवार साहिदीनामा लेहून घेतला आणि दुसरे दिवशी तुजला व सोमाजीस व समाकुळ पाढरीस व भोवरगावींचे गोतास हुजूर राजश्री–स्वामीसंनिध नेऊन उभे केले व तुमा हरदोवादीयांचे कतबे व तकरिरा व राजीनामे गोताचा साहिदीनामा होता तो वाचून दाखविला. त्यावरून राजश्री स्वामींनी अवघ्या गोताच्या मुखें मनसुफी मनास आणून साहिदीनामा पाहिलीयावरी आज्ञा केली की, सोमाजीचा भोगवटा या आठा नवा वर्षांपलीकडे पाच सहा डोया नाही व कागदपत्रही नाहीत व पाढरीच्या व हक जव्हारीच्या साक्षीनशी कोंडाजीचा वंश सोमाजी, कृष्णाजी व हिरोजी व बावाजी यांच्या घरातील नाही आणि सोमाजी दोन चार मनसुफीस राजी होऊन गैरराजी झाला ते सोमाजी झोंडपणे गळा पडतो त्यास सोमाजी खोटा आहे ऐसे झाले त्यावरी सोमाजीस पुरशीस केली की, तू कोणे ठिकाणेहून आला आहेस हा करिना विदित करणें त्यास सोमाजी बोलिला की, आपण आटपाडीस होतो त्यास मुलखास कौल झाला ते समयीं आपण बावाजी बोडका याच्या बोले रयतावीयाचा कौल घेऊन, गावावरी येऊन राहिलो, ऐसें बोलिला त्यावरी राजश्री–स्वामींनीं सोमाजीस आज्ञा केली की, तू जिकडून आलास तिकडे जाणें तुजला मौजेमजकूरचे मोकदमीशी संबंध नाही तरी येजितखत लेहून देणें म्हणून आज्ञा केली त्यावरून सोमाजी बोडका यानें आपले खुष रजावंदीनें हाजीर मजालसीस राजश्री–स्वामीसंनिध छ १९ जमादिलाखर व मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा, भृगुवारीं येजितखत तुझ्या व हिराजीच्या नांवें लेहून दिल्हें की, आपण नाहक कृष्णाजी व बावाजीच्या गळा पडलो होतों. त्यास आपण आपले तर्फेरिवरून व गोताचे साक्षीनशी व भोगवटाही झाला नाहीं यामुळें आपण व आपले भाऊ खंडोजी बोडका ऐसें खोटे झालो याउपरी आपण अगर आपले वंशीचा कोणी कृष्णाजी व बावाजीसीं मोकदमीचा वाद सांगेल, तो गोताचा खोटा व दिवाणचा गुन्हेगार, ऐसें येजितखत लेहून तुजला दिल्हें. त्यावरी राजश्री–स्वामींनी तुही मोकदमी तुझे दुमाला

करून शिरपाव देऊन, वतनपत्रें करून द्यावयाची आज्ञा करून, कृष्णाजी व हिरोजी व बावाजी बोडके यांस जिल्हेचीं पत्रें करून देणें म्हणून राजश्री——स्वामींनीं आज्ञा केली. त्यावरून सोमाजी तुझ्या गळां झोंडपणें पडत होता तो खोटा झाला. याकरितां मौजे-मजकूरचे मोकदमीचें अगदीं वतन तुजला व हिरोजी व बावाजी बोडका याचे दुमाला केलें असे. तरी तुह्मीं दोघे भाऊ येणेंप्रमाणें मौजेमजकूरच्या मोकदमीचे मान वांटून घेणें बितपशीलः—

| तुजकडे मान बितपशील आधीं. | हिरोजी व बावाजी यांकडे मान बितपशील मागें. |
|---|---|
| १ नांगर. | १ होळीची पोळी. |
| १ दसरीयाचा मान. | १ दिपवाळीचा मान. |
| १ शिराळशेट. | १ गौरीचा मान. |
| १ पासोडी निमे. | १ पासोडी निमे. |
| १ खोबऱ्याची वाटी निमे. | १ खोबऱ्याची वाटी निमे. |
| १ तश्रीफ आधीं. | १ तश्रीफ मागें. |
| १ विडा आधीं. | १ विडा. |
| १ चांभारापासून पायपोस जोडा. | १ चांभाराकडून पायपोस जोडा. |
| १ फांटीयाची मोळी आधीं. | १ म्हैस, घर, पालक. |
| १ म्हैस, घर, पालक. | १ फांटीयाची मोळी मागें. |
| १० | १० |

येणेंप्रमाणें तुजकडे व हिरोजी व बावाजी बोडके यांजकडे सदरहू वाहा वाहा मान दिल्हे असेत. तरी सदरहू वांटणीप्रमाणें निमे निमे मान व काळी पांढरी व वतनामुळें हक्क लाजिमा उत्पन्न होईल तें व कोळी याकडील पाणी निमें निमेंप्रमाणें, मौजे-मजकूरचे मोकदमीचें वतन दोघे भाऊ पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवीत जाणें. वतनसंमंधें तुझे माथां शेरणी रुपये——कुलबाब दुतर्फा दोघांकडे करार केली असे. सदरहूची उग-वणी करून पावलीयाचे जाब घेणें. तेणेंप्रमाणें मजुरा असे म्हणून. याविषयीं पत्रें:—

१ वतनपत्र.
१ देशमुख, देशपांडे.
१ देशाधिकारी.
१ कुळकर्णी, चौगुला व रयान.
१ राजश्री पंतसचींव.

५
एकूण पांच पत्रें देणें.

### वतनपत्र १०.

राघो नारायण व खंडो नारायण प्रभू उपनाम कर्णीक देशपांडे, पेण पचमहाल, परगणे साकसें, प्रांत कल्याण, तळकोंकण यासी दिल्हे वतनपत्र ऐसेजे, तुह्मी शाहूनगर-नजिक किल्ले सातारा येथील मुक्कामी स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, परगणे मजकूरचे देशपांडेपणाचें दरोबस्त वतन पुरातन आपलें, आपले वडील बाळजी झिमाजी व आप्पाजी झिमाजी हे वृत्ती अनभवीत असतां, देवजी दत्ताजी व गणेश दत्ताजी प्रभू यांचे वडील केशव प्रभू यासी देशपांडेपणाची गुमास्तगिरी सांगितली. तो मुशारा घेऊन देशपांडेपणाचें कामकाज करीत होता बाळजी प्रभू घाटावर चाकरीस गेले. मागे केशव प्रभूनें देशमुख व अधिकारी यासी मिलाव करून देशकुळकर्णाचें दप्तर आपले घरीं घालून, रयतेची समजाविस करून कारभार करूं लागला बाळजी झिमाजी घाटावरून घरास आला. त्यांनी केशव प्रभू गुमास्ता याचा कारभार देखून, चित्तांत असह्य मानून त्याचे घरचें दप्तर आपले घरीं आणून, वृत्तीचा कारभार करूं लागले. त्यावरून केशव प्रभू गुमास्ता यासी असह्य झालें देसाई व अधिकारी यासी अनरथ करून यासी विरुद्ध अतिशय वाढविला. बाळजी व आप्पाजी यासी मारून वृत्ती आपण करावी ऐसा इत्यर्थ करून देसाई व अधिकारी यासी संकेत करून, बाळजी व आप्पाजी कसबे वासी परगणे मजकूर येथें राहात होते. त्याजवरी देशमुखानी स्वारी नेऊन बाळजी प्रभू वासीमध्यें वनस्पती म्हणवून शेत आहे तेथें जिवे मारिला. व आप्पाजी प्रभू पळोन ठाणे पेण येथें जात होता, तो कुकड-खिंड ह्मणवून आहे, तेथें लोक ठेविले होते त्यांनी व वासीहून धावणें त्याचे पाठिलागास गेले. त्यांनी मिळोन आप्पाजी शेत खिंडींत जिवें मारिला. ऐसे दोघेही भाऊ मारिले. आप्पाजी प्रभूची बायको सगर्भ होती. तीस मारावें म्हणवून लोक फिरोन वासीस गेले. तों ती बायको मोकदम मुसलमान बाईको वासीस होती, तिचे घरीं जाऊन तिजला शरण आली. तिनें अभय देऊन सहुकृत घालून घरती आपण बैसली. स्वारीच्या लोकानी तमाम गावांतील घरें शोधिलीं. मोकदमिणीच्या घरचाही झाडा घेतला, परंतु ती बायको सांपडली नाहीं. लोक उठोन गेले. त्याउपरी रातोंची होडी व माणसें देऊन जलमार्गे फिरयाण तर्फेस पावती केली, तेथें धारा भरून राहिली. प्रसुत झालियावरी तिजला पुत्र जाहला. त्याचे नाव गोविंद प्रभू. ऐं बायकोस पळविलीयानें वर्तमान केशव प्रभूस कळ्लयांन देशमुखास सांगून मोकदमिणीस जिवें मारिली. तिचे दोघे लेक मारिले. त्याजवरी गोविंद प्रभू प्रौढ झाला. वतनाचें वर्तमान आईच्या मुखें सविस्तर ऐकोन मलिकअंबराकडे जाऊन फिर्याद जाहला. त्यांनी त्याची हकीकत मनास आणून, वतनाची तहकिकात करून वृत्तीचे परवाने करून दिल्हे. ते घेऊन घरास आला. माईस परवाने दाखविले. वतनावर जावें तों माय ह्मणो लागली, तूं एकटा वतनावरी गेलियानें अपाय होईल. तुजला अपाय झालियानें घर बुडतो, याजक-रितां वतनावरी जाऊं नको. तुझे पोटीं संतान झालियावरी भूमीवर जाण्याचा विचार

करणे. ऐसा कित्येक प्रकारे बोध करून शपथ घालून राहविले. वतनावरी येऊ दिल्हे नाही गोविंद प्रभू जे वेळेस वतनावरी यावयाचा विचार आपले माईसी करी, ते समयी ती शपथ घालून राहवावी. यानप्रकारे काही दिवस जाहले. इतक्यात घर जळालें. त्यामध्ये मलिकअंबरी परवाने होते ते दग्ध जाहले. गोविंद प्रभूनें आपले लग्न केलें. संसारिकास गुतोन राहिला. त्यामुळें त्याचे येणे वतनावरी जाहले नाही. तेच प्राती राहिला. तेथे त्याचे पोटी पुत्रसंतान जाहले पुत्र चौघे. त्याची नावे बितपशील:—

बापूजी प्रभू १ विठ्ठल प्रभू १ पांडुरंग प्रभू १. गोपजी प्रभू १

येणेप्रमाणे चौघे पुत्र यामध्ये गोपजी प्रभू व विठ्ठल प्रभूचा पुत्र सूर्याजी प्रभू ऐसे दोघे चुलते पुतणे महाराज राजश्री—थोरले कैलासवासी स्वामीचे सेवेसी किल्ले रायगड येथे जाऊन फिर्याद केली इतकियात दसरियाचे मुहूर्तेकरून कैलासवासी स्वामी कर्नाटकचे स्वारीस जावयासी निघाले. पोलादपुरचे मुकामी गोपजी व सूर्याजी विठ्ठल यानी विनंति केली त्यास साहेब मसलतीहून आलियावरी तुमचा इनसाफ करितील, ऐसें ह्मणोन घरास जावयासी या हरदूजणास आज्ञा दिल्ही थोरले स्वामी कर्नाटकचे स्वारीहून आलें-यावरी गोपजी व सूर्याजी प्रभू यानी उभे रहावें, तो संसार कसालीयामुळे एक दोन वर्षे फावले नाही तो थोरले महाराजास कैलासवास जाहला. याउपरी महाराज राजश्री—सिंहासनारूढ जाहले त्यासंनिध गोपजी व सुर्याजी विठ्ठल फिर्याद जाहले वतनाचे वर्तमान साफल्य निवेदन केले. त्यावरून देवजी दत्ताजी व गणेश दत्ताजी याचे वडील गोपाळ दत्ताजी व वामनाजी गोविंद यासी मसाला करून हुजूर नेले, आणि राजश्री मल्हाव निराजी न्यायाधीश होते, त्यास आज्ञा केली की, यांच्या वृत्तीचा निवाडा मनास आणून विदित करणे. त्यावरून त्याही व राजश्री——पंडितराव यानी तकरिरा मनास आणून महालच्या सड्डी नेऊन, साक्ष मोझे मनास आणिले तों गोपजी प्रभू व सूर्याजी प्रभू याची वृत्ती खरी, गोपाळ दत्ताजी व वामनाजी गोविंद यांच्या वडिलास मुतालकी सांगितली होती. त्यानी याचे खून करून वृत्तीचा उपभोग घेऊ लागले ऐसे खरे झाले हें वर्तमान राजश्री—स्वामीपाशी पंडितराव व न्यायाधीश पंत मशारनिल्हे यानी निवेदन केले. ते मनास आणून वतनपत्रे करून द्यावयाची आज्ञा केली. तो राजश्री—स्वामी याची स्वारी संगमेश्वरास जाहली तिकडूनच मोगलाईंत जाणें जाहले पत्रे व्हावयाची तैशीच राहिली. उपरांतिक महाराज राजश्री—स्वामी चेंजी प्राते स्वारीस गेले. या प्राती मोगलाई जाहली. त्यास आपले वडील पांडुरंग प्रभू गोपजी प्रभूचे भाऊ याचा पुत्र रघोजी प्रभू त्याचा पुत्र नारप्रभू आपले बाप हे कल्याणास मोगलाईकडून खान महमद याब सुभा होता त्याचे नायेब गुलाम मोहीदिन सैयद कल्याण भिवंडी येथील अमल करीत होते, त्यापाशी उभे राहिले. वतनाची हकीकत कुली जाहीर केलीयावरी देवजी दत्ताजी व गणेश दत्ताजी यांचा बाप दत्ताजी गबाजी यास मसाला करून कल्याणास नेले. त्याची व याची हकीकत ऐकोन मजालसी

लोक व बालीमवाली व काजी व वतनदार यांजवरी मनसुफी घातली. त्याहीं साक्ष मोझे गोहीं मोकाबलें मनास आणिलें, व दत्ताजी गंबाजी यानें कल्याणाहून आपला भाऊ बाजी गंबाजी होता त्यास कागद लिहिला होता कीं, दुष्ट स्वप्न वार्ता; इब्राइमखान देसाई याचा कांहीं संवाद आहे. पुढें काळ कला प्रसंग पडेल ऐसें दिसतें. इतके दिवस बोलिलों नव्हतों. सांप्रत बोलावेंसारिखें जाहलें. याकरितां मदनाजी काकाजी यानें पत्र घेणें कीं, तुह्मांसी आह्मांसी अर्थाअर्थी संबंध नाहीं. आपण कोपरवल्लीचा कुळकर्णी हें खरें. जो वाद सांप्रत असेल तो व तुह्मी जाणा. आपणांस देशकुळकर्णाचा तालुका नाहीं, ऐसा कागद लिहिला होता तोच बजिनस सांपडला. तो पंचाईतास दाखविला. त्यावरून दत्ताजी गंबाजी खोटा जाहला. आपले बाप नारो रघुनाथ यासी दरोबस्त देशकुळकर्णाचा महजर करून दिल्हा. तो महजर आपणापाशीं असतां, देवजी दत्ताजी व गणेश दत्ताजी यांचा बाप दत्ताजी गंबाजी व चुलता बाजी गंबाजी हे दोघे भाऊ राजश्री कान्होजी आंगरे सरखेल होते त्याजकडे कुलाबियास गेले. तेव्हां आपला बाप नारो रघुनाथ कल्याणचा महजर घेऊन जाऊन सरखेल मशारनिल्हेस दाखविला. तो महजर पाहून पंचाईतावर इनसाफ सोंपविला. परगणे मजकूरचे देशक नेऊन लष्करिरा मनास आणिल्या. त्यास आपले बाप नारो रघुनाथ याहीं सांगितलें कीं, वादीयाचे वडील, आपले वडिलानीं गुमास्ते ठेविले असतां, त्यांचे खून करून वतन चालवूं लागले. त्याची साक्ष मनास आणितां, अंताजी अंकुशराव देसाई परगणे मजकूर व वरकड वतनदार होते त्यांजवर सत्य घालून साक्षी पुसों लागले. तेव्हां देसाई मजकुरानें साक्ष दिल्ही जे, नार प्रभू वतनदार खरा. याच्या वडिलानीं दत्ताजी प्रभूच्या वडिलास गुमास्तगिरी सांगितली होती. त्यास आपल्या वडिलानीं दत्ताजी प्रभूच्या वडिलाचा प्रतिपक्ष धरून नार प्रभूच्या वडिलाचे खून केले. बाशीकर मोकदमीण नार प्रभूच्या वडिलाचे मायेंत होती. ह्मणून तिचे पाठीकडून काळीज काढून मारिली. तिचे दोघे मूल मारिले. [illegible] दत्ताजी प्रभूचा वडील केशव प्रभू गुमास्ता ठेविला होता त्याची वतनावर स्थापना [illegible], हें खरें. तैसेंच वाशीकर मोकदम बाबाखान यानें साक्ष दिल्ही कीं, नार प्रभू वतनदार खरा. याच्या वडिलानिमित्य आपली पूर्वजीण देशमुखानीं मारिली. तिचे दोघे लेक मारिले हें खरें. त्यावरी वेठ प्रभू कुळकर्णी मौजे उंबरडे व विठल भाव प्रभू बाळाजी गंभीरराव अवकारी तपे छतिसी परगणे मजकूर यानींही साक्ष दिली कीं, वतन नारो रघुनाथ याचें खरें. दत्ताजी व बाजी प्रभू यांच्या वडिलानीं यांचे खून करून वतनाचा उपभोग करितात. याप्रमाणें साक्षी पुरल्यावरी पंचाईतांनीं सदरहू करिना राजश्री सरखेल मशारनिल्हेस दाखल केला. त्यावरून त्याहीं आपणांसमक्ष सर्वांस नेऊन, साक्ष मोझे मनास आणिले; आणि वतन नार प्रभूचें खरें, दत्ताजी प्रभू व बाजी प्रभू यांस वतनासीं संबंध नाहीं ऐसें बोलले. तो विसोबा नाईक व रंगोबा नाईक पेठणकर हे पंचाईतांत होते, परंतु ते समयीं रदबदल करूं लागले कीं, दत्ताजी गंबाजी व बाजी गंबाजी यांचा भोगवटा जाहला आहे.

याकरिता निमेनिमप्रमाणें वतन दोघांस देऊन समजाविस करावी. आपणापाशीं न्याय जाहला, त्याचा कजिया मागती दुसरीकडे न जावे ऐसें करावें ह्मणून बोलिले. ते गोष्टी राजश्री सरखेल मशारनिल्हेनें ऐकोन आपले बाप नारो रघुनाथ यास सांगितलें कीं, निमे वतन तुह्मी घ्या, निमे वतन दत्ताजी प्रभू व बाजी प्रभू यास देतो. त्यास आपल्या बापानीं उत्तर केलें कीं, आपलें दरोबस्त वतन असतां निमे काय ह्मणोन घ्यावें ? तेंव्हा राजश्री सरखेल याचा निकर्ष दिसून आला. ते समयीं आपले बाप नारो प्रभू यानी चित्तांत विचार केला जे, ज्याचे सत्तेमध्यें आपलें वतन त्याचें न ऐकतां परिणाम बरा नाहीं ऐसें चित्तांत आणोन निमे वतन कबूल केलें. त्यावरून राजश्री सरखेल मशारनिल्हेनीं निमे वतनाचा गोत महजर आपल्या शिक्क्यानिशीं करून दिल्हा. त्याजप्रमाणें आपले बाप वतनचा उपभोग करूं लागले दत्ताजी गत्राजी व बाजी गत्राजी यास निमे वतनाची सनद करून देत होते ते त्यानीं घेतली नाहीं. त्याउपरी दत्ताजी प्रभू व बाजी प्रभू मृत्य पावले उपरातिक दत्ताजी प्रभूचे पुत्र देवजी दत्ताजी व गणेश दत्ताजी हे, राजश्री बाजीराव पंडित प्रधान होते याजपाशीं फिर्यादि झाले. त्यावरून त्याही आपले बाप नारो रघुनाथ यासी तलब करून नेले व साक्ष मोझ्याबद्दल परगणे मजकूरचे देशक नेऊन दोन चार मन्यालसी केल्या ते समयींही कल्याणच्या व राजश्री सरखेल मशारनिल्हे याच्या महजराप्रमाणें साक्षी पुरल्या परंतु मसलाशी होऊन निवाडा जाहला नाहीं, तोंव आपले बाप नारो रघुनाथ मृत्य पावले. उपरातिक पंडित मशारनिल्हेनीं आपणास नेऊन पुरशीस केली कीं, तुम्ही वतनाचें भांडण भांडतां कीं नाहीं ? त्यास आपण उत्तर केलें जे, वतनाचा कजिया सोडीत नाहीं. बरहक इनसाफ रुबरू करावे, अगर पंचाईत नेमून द्यावी, त्यास आपण रजावंद आहों ह्मणून बोलिलों. त्यावरी मनसुफीची मसलाशी होणेंच आहे, तों पंडित मशारनिल्हे व राजश्री चिमणाजी पंडित यासी देवाज्ञा जाहली. त्याजउपरी सन आर्बा आर्बैन मया व अलफ या साली राजश्री बाळाजी पंडित प्रधान या सनिध सातारियाचे मुक्कामीं आपले मनसुफीचा प्रसंग पडला. याजकरितां पंडित मशारनिल्हेनीं परगणे मजकूरचे देशक आणवून, आपले रुबरू साक्ष मोझे मनास आणून, आह्मा हरदू वादीयास राजश्री सदाशिव पंडित याजकडे पुण्यास रवाना केलें. आणि ते सांगतील त्याप्रमाणें वर्तणूक करावयासीं सांगितलें, त्याजवरून पुण्यास गेलों. तेथें आह्मा हरदू वादीयानीं समजावीस करून दिल्हे करावयाचा विचार पंडित मशारनिल्हेनीं केला. त्यास गणेश दत्ताजी ह्मणों लागला जे, दरोबस्त वतन आपलें आहे. आपण समजाविशीस राजी नाहीं. त्याजवरून पंडित मशारनिल्हे त्यास बोलिले जे, दरोबस्त वतन आपलें ह्मणतोस, तरी दिव्य करिशील की काय ? तेंव्हा गणेश दत्ताजी दिव्यास रजावंद जाहला. तेव्हा श्री कल्याणींचे तर्फेस स्पष्ट दिव्यास नेमून राजश्री त्रिंबक विनायक सुभेदार, प्रांत कल्याण यास दिव्य व्यावयाविशीं पत्रें देऊन रवाना केले. तेथें कल्याणास हरदूवादी गेलों, त्यास सुभेदार मशारनिल्हेनीं आह्मा हरदू-

वादीयास राजीनामे वर्तणुकेस जमान मागितले त्यावरून राजीनामे लेहून देऊन वर्तणुकेस जामीन दिल्हे बितपशीलः—

गणेश दत्ताजी यानी गणेश निळकंठ देशकुळकर्णी तर्फ नागोठणे यासी जामीन दिले १

आपण त्रिंबकराव बावाजी व लक्षुमणराव भिकाजी अधिकारी तर्फ ह्मरापूर यास जमान दिले १

येणेप्रमाणे जामीन दिल्हे याउपरी गणेश दत्ताजीनें दिव्य करावयास जावे तो तेथील ब्राह्मणसभेच्या विचारें गणेश दत्ताजीचा भोगवटा होत आला आहे यास दिव्य बोलले नाही ऐसा निर्णय जाहला तो सुभेदाराहीं व ब्राह्मण मंडळीनी पत्रे लिहून पुण्यास पत्रे रवाना केली तो राजश्री–पंतप्रधानहीं सातारियाहून पुणीयास गेले आणि सुभेदारास प्रत्योत्तर पाठविले की दिव्य तहकून केले हरदु वादीयासी माघारे पाठविणें त्यावरून सुभेदाराही आज्ञा वादीयास पुण्यास जावयास सांगितले याजकरिता आपण श्रावणमासी पंडित मशारनिल्हेसंन्निध पुण्यास हाजीर जाहलो तेथेंही सर्व सभेच्या मते गणेश दत्ताजीनें दिव्य करावेसे नाही आह्मी दिव्य करावें ऐसा इत्यर्थ जाहला त्याजप्रमाणे आपण दिव्य करावयास रजावंद जाहलो गणेश दत्ताजीही आमच्या दिव्यास रजावंद जाहला त्याजवरून पंडित मशारनिल्हेनी स्वारीमध्ये श्री गोदातीरी दिव्य घ्यावयाचा करार केला पंडित मशारनिल्हे स्वारीस चालिले तेव्हा आह्मी हरदूजण वादे गोदातीरास समागमे गेलो तेथे वर्तणुकेस जामीन कल्याणी घेतले होते तेच करार करून, आह्मा हरदू वादीयाजवळून कतबे लेहून घेतले बितपशील —

गणेश दत्ताजीनें कतबा लेहून दिल्हा जे, पहिलेपासून वतन आपले आपले वडिलाघासून आजितागाईत आठ पुरुष वतन खात आलो आहो राघो नारायण याच्या वडिलाची गुमास्तगीर आपले वडिलानी केली नाही हे खरे आहे त्यास राघो नारायण यानी दि य करावे दिव्यास लागले तरी दरोबस्त वतन आपण खाऊ दिव्यास खरे निघाले तरी दरोबस्त वतन त्यानी खावे आपल्यास अर्थाअर्थी संबंध नाही येणेप्रमाणे कतबा दिला १

आपण कतबा लेहून दिल्हा की, पहिले वतन गोळकाचे होते, त्याजवळून आपल्या वडिलानी विकत घेतले आणि गणेश दत्ताजी याच्या वडिलास गुमास्तगिरीस ठेविलें होतें तेच बळाऊन मारे करून वतन अनभवू लागले हे गोष्ट खरी आहे आपण दिव्य करीन दिव्यास लागलो तरी वतनासी संबंध नाही दरोबस्त वतन गणेश दत्ताजीनें खावे दिव्यास खरा जाहलों तरी दरोबस्त वतन आपण खाऊ गणेश दत्ताजी यास अर्थाअर्थी संबंध नाही येणेप्रमाणे कतबा लेहून दिल्हा १

येणेप्रमाणे कतबे लेहून घेऊन कसबे कोपरगाव परगणे कुंभारी श्री गोदातीर येथे श्रीशुक्रेश्वर देवासंन्निध दिव्य नेमून थोर थोर पंडित, शास्त्रज्ञ, उभय गंगातीरचे व कसबे मजकूरचे व राजश्री–पंत प्रधान या समागमे होते, त्याचे समते शास्त्रार्थ पाहून शके

१६६६ रक्ताक्षीनाम सवत्सरे, पौष शुद्ध दशमी, बुधवारी मज राघो नारायणाच्या हातास पिशव्या घालून दोन्ही हातावरी लाखोटे केले दुसरे दिवशी गुरुवारी प्रातःकाळी एकादशीस श्रीसनिध गोदातीरी पडित मशारनिल्हे व ब्राह्मणमडळी व मातबर लोक गोदातीर व कोकण व बाजे प्रातीचे वतनदार वगैरे यासह बैसोन समस्ता हुजुर हातीच्या पिशव्या काढून हातावरी साली घालून दोनी हात घासून धोवविले. आणि दोही हाताची चिन्हें लेहोन ठेवोन लोखडाचा गोळा पचाशत पळाचा, ह्मणजे वजन १६६॥२ एकशे साडेसाहासष्ट तोळे दोन मासे वजन करून, कोळशे यात घालून, अग्नीमध्ये माते लाऊन, निवार तप्त करून, कपाळी भाळपत्र बाधून, अश्वत्थाची सात पाने हातावरी ठेऊन, कच्चा सुताने गुटाळोन गोळा साडसाने धरोन, मज राघो नारायणाच्या हातावर ठेऊन सात मडळे चालोन जाऊन आठवे मडळी गोळा ठेवावयाची आज्ञा केली त्याजप्रमाणे गोळा हातावर घेऊन, सात मडळे चालून जाऊन आठवे मडळी गोळा ठेवावयाचे नियत स्थळ केले होते तेथे ठेविला तो नियत स्थळकुडात कणीक अगोदर घातली होती ते जळो लागली भुलोजी पाटील ढमढेरे तळेगावकर याच्या हाती सरमडाच्या पेढ्या दिल्या होत्या त्या त्यानी गोळ्यावर टाकिताच सरमडाच्या पेढ्यानी अग्नि घेऊन ज्वाळा निघो लागल्या मग आपले दोनी हात सर्व सभा आदिकरून पडित मशारनिल्हेनी पाहिले व गणेश दत्ताजी यास दाखविले तो हातास अणुमात्र अग्निस्पर्श जाहला नाही. उपरातिक मागती दोही हातास पिशव्या घालून लाखोटे केले आणि दोन प्रहर दिवस व चार प्रहर रात्र ठेऊन दुसरे दिवशी द्वादशीस शुक्रवारी प्रात काळी मजालसीस नेऊन हातीच्या पिशव्या फाडून, सर्व सभा आदिकरून पडित मशारनिल्हेनी हात पाहिले गणेश दत्ताजी यास दोनी हात दाखविले तिळतुल्य दका हातास लागला नाही फोड, पुटकळी किंचित हातास न आली दिव्य करविले ते समयी हाताची चिन्हे लेहून ठेविली होती, त्याप्रमाणे हात रुजू पाहिले. पूर्व चिन्हास तिलप्राय अतर पडले नाही. येणेप्रमाणे तप्त दिव्य मज राघो नारायणापासून घेतले श्रीने व श्रीगगेने आम्हास खरे करून आमचे वतन आम्हास दिल्हे. त्यावरून राजश्री पत प्रधान यानी आपली पत्रे करून आपल्यास दिल्ही आहेत. व देवजी दत्ताजी व गणेश दत्ताजी भाडत होते ते खोटे जाहले त्यानी आपणास येजितखत लेहून दिल्हे आहे हे महाराजाही मनास आणून परगणे मजकुरचे देशकुळकर्ण व गावगन्नाची कुळकर्णे व टिपनिशी व गौळियाचे कुळकर्ण व पुरातन वतनें आपली आहेत त्याप्रमाणे पत्रें करून देऊन वतनें वशपरपरेने चालविली पाहिजे म्हणून विनति करून राजश्री नाळाजी पडित प्रधान याची राजश्री कानोजी आगरे सरखेल होते त्यानी महजर करून दिल्हा आहे. तो व कल्याणी मोगलाई अमलदार होते त्याचा महजर व येजितखत आणून दाखविले तें येजितखत बितपशील:—

"येजितखत शके १६६६ रक्ताक्षीनाम सवत्सरे, पौष शुद्ध त्रयोदशी, शनवार ते दिवशीं राघो नारायण व खडो नारायण देशपाडे परगणे साकसें उर्फ पेण यासी देवजी दत्ताजी

व गणेश दत्ताजी प्रभू सुरुसन खमस अर्बेन मया व अलफ सन हजार ११५४ कारणें येजितखत लेहोन दिल्हे ऐसेजे, तुमचा व आमचा परगणे मजकूरच्या देशपांडेपणाचा कजिया पूर्वी महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति स्वामीच्या कारकिर्दीस तुमचे वडील व आमचे वडील भांडले होते तुमचे वडील ह्मणत होते की, पहिले वतन गोळकाचे होते त्यापासून आपल्या वडिलानी विकत घेतले, आणि गणेश दत्ताजी याचे वडील गुमास्तगिरीस ठेविले होते तेच बळावून मारेचुरे करून बळे वतन खाऊ लागले, परतु दरोबस्त वतन आपले व आपले वडील म्हणत होते की दरोबस्त वतन आपले आहे आपण पिढी दरपिढी खात आलो आहो भोगवटा आपला आहे ये गोष्टीने भांडण पडले होते. परतु विल्हे लागले नाही त्यावर कल्याणचा सुभा, खान महमद यासी होता त्याचे नायब गुलाम मोहिदीन कल्याणी राहत होते त्यापाशी तुमचे बाप व आमचे बाप भांडत गेले तेथे जव्हारचे हमशाही वतनदार याच्या रुबरू इनसाफ करून दरोबस्त वतनाचा महजर तुमच्या बापास करून विधला त्यावर राजश्री कानोजी आग्रे सरखेल यापाशी आमचे बाप दत्ताजी प्रभू व चुलते बाजी प्रभू फिर्याद गेले त्यावरून तुमचे बाप नार प्रभूही कल्याणचा महजर घेऊन सरखेलीपाशी कुलाबियास आले ते समयी राजश्री सरखेल यानी वतन दो जागा करून तुह्मास निमे दिल्हे. त्यानी सनद करून तुह्मास दिधली. निमे वतन आह्मास देत होते, परतु आपले बापानी कबूल केले नाही. आपले बाप व चुलते मृत्य पावले. त्यावर आपण, श्रीमंत राजश्री बाजीराव पंडित प्रधान याजपाशी उभे राहिलो. श्रीमंतानी तुमच्या बापास व तुम्हास हुजूर आणून दोन चार मजालसी केल्या, परतु विल्हे लागले नाही. त्यावरी सालगुदस्ता श्रीमंत राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान साहेबापाशी सातारीयाचे मुक्कामी तुमची आमची मनसुबीचा प्रसग पडिला. त्याजवरून परगणे मजकूरचे जमीदार व देशक कुल सातारीयास हुजूर आणून ग्वाही साक्ष मनास आणून उभयताची समजाविस कराबी ऐसा इत्यर्थ केला त्यास आपण बोलिलो की, दरोबस्त वतन आपले आहे, समजाविशीस आपण राजी नाही त्यावरून श्रीमंतानी आपणास आज्ञा केली की, दरोबस्त वतन तुझे आहे म्हणतोस, तरी तु दिव्य करणे. त्यास आपण दिव्य करावयास रजावद जाहलो. त्यावरून कल्याण सुभे यास पत्रे देऊन दिव्य करावयासी पाठविले. तेथे दिव्याचे जमान आपण दिल्हे व तुह्मी आमच्या दिव्यास राजी होऊन जमान दिल्हे. त्यास तेथील ब्राह्मणसभेच्या विचारे जाहले की, गणेश दत्ताजीचा भोगवटा आहे, त्यास दिव्य बोलिले नाही. ह्मणून ब्राह्मणानी व सुभेदारानीं श्रीमंतास पत्रे पाठविली. व तुह्मी व आह्मी हुजूर आलो हुजूरही सभेच्या विचारे जाहले की, तुह्मास भोगवटा नाही, तुह्मी दिव्य करावे, व आपलेही चित्तास आले की, तुह्मी दिव्य करावे ह्मणून तुमच्या दिव्यास राजी जाहलो व तुह्मीही दिव्य करावयासी राजी जाहलेस. श्रीमंतानी आज्ञा केली की, सातारीमध्ये श्रीमंतांच्या मुक्कामी दिव्य घेतले जाईल. त्यावरून श्रीमंतासमागमे तुह्मी व आह्मी सातारीबरोबर गोदातीरास आलो. तेथे तुह्मापासून खतना लिहून

घेतला. तुह्मी कतबा लिहून दिधला पाहिले वतन गोळकाचे होत त्यापासून आपले वडिलानी विकत घेतले. गणेश दत्ताजीचे वडील गुमास्तगिरीस ठेविले होते तेच बळावून मोरे-चुरे करून वतन खाऊ लागले, ही गोष्ट खरी आहे आपण दिव्य करीन खरा जाहलो तरी दरोबस्त वतन खाईन. खोटा जाहलो तरी वतनासी संबंध नाही दरोबस्त वतन गणेश दत्ताजीन खावे ऐसा कतबा तुम्ही लेहून दिल्हा व आपण कतबा लेहून दिधला की, पहिलेपासून दरोबस्त वतन आपले आपल्या वडिलापासून आजतागाईत आठ पुरुष वतन खात आलो आहो. राघो नारायण याचे वडिलाची गुमास्तगिरी आपले वडिलानी केली नाही, हे खरें आहे. त्यास राघो नारायण यानी दिव्य करावे दिव्यास खरे निघाले तरी दरोबस्त वतन त्यानी खावे, आपल्यास संबंध नाही दिव्यास लागले तरी दरोबस्त वतन आपण खावे, ह्मणून कतबा लेहून दिधला. त्यावरून श्रीमतानी थोर शिष्ट ब्राह्मण पंडित शास्त्रज्ञ समागमे होते त्यास व महास्थळ कसबे कोपरगाव परगणे कुभारी व उभय गगातीरीचे ब्राह्मण याचे मते धर्मशास्त्र पाहून, दिव्याचा निश्चय करून पौष्य शुद्ध दशमी, बुधवारी तुमच्या दोही हातास थैल्या घालून लाखोटे केले. त्यावरी दुसरे दिवशी पौष शुद्ध एकादशी, गुरुवारी प्रातःकाळी कसबे कोपरगावी श्रीभगतगिरी श्रीशुक्लेश्वरसंनिध ब्राह्मणसभा व श्रीमंत राजश्री पतप्रधान व मातबर लोक गगथडीचे व कोकण प्रातीचे वगैरे वतनदार या हुजूर, हातीच्या पिशव्या काढून, हातास साली लावून धोवून, दोही हाताची चिन्हे लेहून घेतली आणि तप्त दिव्य लोखडाचा गोळा शास्त्रप्रमाण पच्याशतपळाचा, ह्मणजे, एकशे साडेसाहासष्ठ तोळे, दोन मासे वजन करून, त्रिवार तप्त करून, तुमचे कपाळी भाळपत्र बांधोन अश्वत्थाची सात पाने कच्चे सुताने गुडाळून तुमच्या हातावर ठेविली. आणि गोळा साडसाने धरून त्यावरी ठेविला तुह्मी सात मडळे ओलाडून आठव्या मडळात गोळा टाकिला तेथे अग्नीच्या ज्वाळा निघाल्या त्यावरी तुह्मी मजालसीत येऊन हात दाखविले त्यास तुमच्या हातास अणुमात्र काही ढका लागला नाही. हे सर्व सभेने व आपण पाहिले त्यावरी मागती दोही हातास थैल्या घालोन, लाखोटे करून दोन प्रहर दिवस व चार प्रहर रात्र ठेविले. मग द्वादशी, शुक्रवारी प्रातःकाळी सदरेस आणून पिशव्या काढून मागती दोनी हात सभेनें व आपण पाहिले तो चोखट हात निघाले तिळतुल्य ढका लागला नाही, व फोडही आला नाही. श्रीने व गगेने तुह्मास खरे करून तुमचे वतन तुह्मास दिल्हे आपण लायेणी भाडत होतो, ते खोटे जाहलो. याउपरी देशपाडेपणाचे वतन परगणे मजकूरचे तुमचे तुह्मी पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनुभवून सुखरूप असणे. आपल्यास अगर आपले वशीचे भाऊबंदास अर्थाअर्थी संबंध नाही. आपणापाशी वतनी कागदपत्र होते, ते पूर्वी श्रीमतापाशी कुल्ली दिधले आहेत. कदाचित् काही राहिले असिले तरी ते रद्द असत. हें येजितपत्र लिहिले सही तेरीख १२ जिल्हेज बिकलम"

येणेप्रमाणे येजितखत व सदरहू पत्रे आणून दाखविली. त्याजवरून मनास आणिता

महाराज राजश्री आबासाहेब यासंनिध राजश्री प्रल्हाद निराजी न्यायाधीश व पंडितराव होते, त्यांचे विद्यमानें वतन तुमचें खरें जाहलें. याचा दाखला, राजश्री कानोजी आंगरे सरखेल होते त्याचा महजर तुह्मांजवळ आहे. त्यामध्यें महादाजी गणेश तल्होजकर कुळकर्णी हे न्यायाधीश मशारनिल्हेजवळ ते वेळेस होते. त्यांनीं साक्ष दिल्ही त्याजवरून पुरला. उपरांतिक कल्याणी मोगलाई अंमलदार होते त्यांनीं काजी व बाजे वतनदारांवर इनसाफ टाकिला. त्यांनीं साक्ष मोझे मनास आणिलें. याखेरीज गणेश दत्ताजीचा बाप दत्ताजी गंबाजी यानें आपला भाऊ बाजी गंबाजी यास मदनाजी काकाजी याचे हातचें पत्र, आपण कोपरवलीचे कुळकर्णी देशपांडेपणासी संबंध नाहीं ह्मणून, त्यापासून लेहून घेणें. दुष्ट स्वप्न पडिलें आहे; काळकला कळत नाहीं. ह्मणून संकेतपूर्वक पत्र लिहिलें होतें. तेंच बजिन्नस तुमचे बाप नारो रघुनाथ यासी सांपडलें. तें त्यांनीं पंचाईतास दाखविलें. त्यावरून दत्ताजी गंबाजी आपल्या हातच्या दस्तऐवजानशीं खोटा जाहला. तुम्ही खरे जाहलेत. ऐसें असोन फिरोन राजश्री कानोजी आंगरे सरखेल होते त्यापाशीं फिर्याद जाहले. तेव्हां तुमचे बाप नारप्रभू यानीं कल्याणचा महजर नेऊन सरखेल मशारनिल्हेस दाखविला. त्यावरून त्यांनीं तुमच्या वतनाची चौकशी पुरशीस करणें तैशी केली. एकदोन वेळां तेथें मनसुफीचा फड पडिला, तेव्हांही तमाम वतनदारांचे साक्षीनें वतन तुमचें खरें जाहलें! गणेश दत्ताजीचे वडील गुमास्ते, त्यानीं तुमचे वडिलांचे खून देशमुख परगणे मजकूर याजकडून करविले. ते ग्वाही ज्यानीं खून केले त्याचेच वंशज अनाजी अंकुशराव देशमुख परगणे मजकूर यानीं दिल्ही. तैसेच वाशीकर मोकदमीण तुमच्या वतनाबद्दल मारिली होती ते साक्ष बाबाखान मोकदम वाशीकर यानीं दिल्ही कीं, नारप्रभूच्या वतनाबद्दल आपली पूर्वजीण देशमुखाच्या वडिलांनीं मारिली. तिचे दोघे लेंक मारिले. वरकड भोवर महालकरी यांनींही वतन नारप्रभूचें खरें ह्मणून साक्षी दिल्या. ऐसियास गणेश दत्ताजीचा भोगवटा होत आला. याजकरितां सरखेल मशारनिल्हेनीं तुमच्या बापास निमे वतन दिल्हें, आणि निमें गणेश दत्ताजीच्या बापास देत होते; तें त्यानें कबूल केलें नाहीं. खोटा असतां लयेणी (?) कजिया करीत होता. उपरांतिक मृत्य पावला. त्यामागें त्याचा लेंक गणेश दत्ताजी राजश्री बाजीराव पंडित प्रधान होते त्यांजपाशीं फिर्याद जाहला. त्यानींही दोन चार मजालसी करून साक्ष मोझे मनास आणिले; परंतु गणेश दत्ताजीचा मूळ वतनदारीचा दाखला पुरला नाहीं. गुमास्तगिरीचा दाखला पुरला. त्याच इनसाफाची मसलाशी झाली नाहीं, तों तुमचे बाप नारो रघुनाथ मृत्य पावले. उपरांतिक तुह्मांस पंडित मशारनिल्हेनीं नेऊन वतनाचा वाद सांगतां कीं काय ह्मणून पुशिलें. तुम्हीं वाद सांगावयासी रजावंद होऊन, वाद सांगो लागला. इनसाफ होणेंच आहे. तों पंडित मशारनिल्हेस व राजश्री चिमणाजी बल्लाळ यांसी देवाज्ञा झाली. उपरांतिक राजश्री बाळाजी पंडित प्रधान यानीं परगणे मजकूरचे देशक जमा करून आपले रुबरू साक्ष मोझे मनास आणिले. तेव्हांही मूळ

आंबराई, शेत, सिलोत्तर, घर, ठिकाण, मानपान, तश्रीफ, कानुकायदे, हक्क, लाजिमा, पुरातन असेल त्याप्रमाणें घेऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतनें अनुभवून सुखरूप राहणें. या वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा कुलबाब, कुलकानु रुपये——करार केले. याचा वसूल निमे हुजूर व निमे जिल्हेकडे झाला असे जाणिजे. येविषयीं पत्रें:—

१ मुख्य वतनपत्र.
१ देशमुख अधिकारी परगणे मजकूर.
१ देशाधिकारी लेखक वर्तमान व भावी.
१ मोकदमानी व खोत पाटील व शेटे महाजन व स्थान.
१ राजश्री प्रधानपंत.
१ राजश्री मानाजी आंगरे वजारतमाहा.

६

पत्र छ ३ जमादिलाखर सन समान आर्बेन, प्रभवनाम संवत्सरे.

## निवाडपत्र ११.

कित्ता निवाडपत्र चिटणिशी छ २४ रबिलाखर, कसबा इंदापूर येथील महार व मांग यांस वृत्तीचें भांडण लागलें होतें. याबद्दल हुजरून यांसी पैठणच्या थळास पाठविलें. यासी गोदनाक व बहिरनाक महार यांनीं व ताननाक गोदनाक मांग यांनीं राजीनामे लिहून दिल्हे कीं, निर्बंधीं निवडेल त्यास आपण राजी असों. त्यावरून हाजीर मजालसी यानीं पंडितापासून निर्बंध काढवून निर्बंधी पाहतां निघाले जे, पड पडेल तें महारांनी घ्यावी, आपली जीवनवृत्ती करावी. प्रेताचें वस्त्र व ८४ चार रुक्के घेणें ते महारांनीं घ्यावें व महालक्ष्मीची सुवाशीण व पेंढीयाची पागर गांवाभोंवतीं फिरवावी हे वृत्ती महाराची आहे. भूमीपुत्र महार. त्यानें पागर पेंढीयाची गांवाभोंवती फिरवावी. मांगास संबंध नाहीं. मांगानें नाडें कातडीयाची व तांती करून आपली उपजीविका चालवावी. ऐसे निर्बंधीं निर्वाह झाला. त्यानें प्रमाणे पैठणहून सडी आली. त्याप्रमाणें हल्लीं महार व मांग यांचा निवाडा करून दिल्हा असे. यांविषयीं पत्रें सदरहू पंचाईतीचा महजर व मौजे खडकी प्रांत— येथील निवाडपत्र आहे. त्याप्रमाणें सदरहू हरदोजण महार व मांग कसबे मजकूर यांना निवाडा करार केला असे.

## अभयपत्र १२.

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान तहा वाघोजी बिन हिरोजी येबिन गंगाजी पाटील भिसे, मौजे पानवाडी तर्फ निरथडी, प्रांत पुणें, सुरुसन सीत खमसेन मया अलफ. दिल्हें अभयपत्र ऐसेंजे, तुवां कसबे पुणें येथील मुकामीं हुजूर येऊन विदित केलें कीं, वाघोजी बिन हिरोजी येबिन गेन्होजी पाटील

मिसा, मौजे मजकूर हा आपल्याशी कजिया करीत होता की, तू आपला हाड भाऊ नव्हेस. तुजला काळीमध्ये शेत नाही व पाढरीमध्ये घर नाही आपण त्याजला म्हणत होतों की, वडील बूड धाकोजी मिसा, याची तक्सीम एक. त्याचा वश लिंगोजी मिसा, मौजे दौंड, तर्फ पाटस, प्रात मजकूर येथे हल्ली नादत आहे त्याचे धाकटे बूड गणोजी मिसा, त्याचा वश रामजी बिन फिरंगोजी व आपण, आम्हा धाकटे तिसरे बूड हरजी मिसा, त्याचा वश तूं वाघोजी, ऐसें म्हणत होतो. परतु तिघे एक जथीं नव्हो. आडनावचे भाऊ आहो. ऐसें भाडण माडीत साहेबाकडे आलो. साहेबी हरदोजणाचे वर्तमान मनास आणून, पचाईत नेमिली त्यास वाघोजीनें अर्ज केला की, आपण येथील पचाईतीस राजी नाही. आह्मी आपआपणात, मौजे करजे येथील थळास जाऊन समजतो वे गोष्ट आपणही कबूल केली. तेव्हा साहेबी थळ मजकुरास जावयाची आज्ञा दिल्ही. मग वाघोजी व आपण शके सोळाशे पचाहत्तर, श्रीमुखनाम सवत्सरी, आषाढ मासी करजापाशी गेलो गोतास वाघोजीनें व आपण हकिकत जाहीर केली. गोताने वाघोजीपासून व आपल्यापासून तकरिरा घेऊन, वर्तणुकेरा जमान घेतले, आणि पुसिलें की, तुह्मी कोणे गोष्टीस राजी आहा. तेव्हा वाघोजी बोलिला की, आपण वार्तीचे क्रियेस रजावद आहो ते गोष्टीस आपणही रजावद होऊन वाघोजीनें व आपण राजीनामे लिहून दिल्हे. तेव्हा गोताने दिकत घेतली की, वार्तीचे क्रिया करणें तेव्हा सरकारचें पत्र पाहिजे. तेव्हा वाघोजी व आपण मागती साहेबाकडे पुणियाचे मुक्कामी येऊन, हकिकत जाहीर करून, शिक्क्यानशी सरकारचे ताकीद पत्र करजेकरास, वातीची क्रिया करावयासी घेऊन थळास गेलों. गोतास साहेबाचे पत्र दिल्हे. तो श्रावण मास गेला. भाद्रपद मासात क्रिया करता नये ह्मणून गोतानें सांगितले सबब हरदोजण घरास गेलो त्यावर सालगुदस्ता श्रावणमासी दिवाण हुकूम घेऊन करज्यास गेलो. मागती पचाइतानी दिकत घेतली की, दिवाणचा अमीन पाहिजे. अमीन घेऊन येणें त्याचे साक्षीनशी निवाडा होईल. त्यावरून फिरोन साहेबापाशी येऊन अमीन द्यावयासी अर्ज केला साहेबी, राजश्री बगाजी साबाजी कमाविसदार, कसबे सासवड, हे अमीन दिल्हे त्यास घेऊन करजीयासी गेलों करजेकर थळ नाईक यानी भोंवरगावचे गोत जमा करून, हरदोजणाचे रजावदीनें वार्तीची क्रिया श्रीसिनिध नेमिली. त्याप्रमाणें आपला पुतण्या भवानजी बिन रखमाजी यानें व वाघोजी मिसा याने आपल्या बोलीप्रमाणें उच्चार करून, श्रीपाशीं चिठ्या लेहून ठेविल्या आणि विहिरीत उभयतानी आघोळी करून, पाच पाच तोळे कणकेचे दिवे दोघानी वीन करून, दर दिवियासी अर्ध तोळाप्रमाणें तेल घालून, बरोबर श्रीपाशी उभयतानीं वाती लाविल्या. वाघोजीची यात अगोदर अवघे तेल जळालें विझाली. त्यावर आपला पुतण्या भवानजी याची वात तीनशे टाळी वाजत तोंवर होती. आपण खरें झालों म्हणून गोतानें आपलें भरें वार्तीस फूल दिल्हें. आपल्या दिव्यात तीन मासे तेल बाकी राहिलें. आपण म्हणत होतो ती गोष्ट

खरी झाली. वाघोजी म्हणत होता, ती मोघ लटकी झाली. त्याजवरून करंजेकर पुजारी यांनीं व गोतानें, आपल्यास थळपत्र करून दिल्हें. व वाघोजीनें आपलें येजितपत्र लेहून दिल्हें आहे, ते मनास आणून आपल्यास सरकारचें पत्र करून, दिल्हें पाहिजे म्हणून, त्याजवरून थळपत्र व येजितपत्र, मनास आणून अभयपत्र दिल्हें."

## १३. न्यायाधिशीकडील बारनिशींतील उतारे वगैरे.

खासुदगी न्यायाधिशीकडील, सुहुरसन इहिदे सीतैन मया व अलफ. किरकोळी कागद. बाबास बोलावणीं केली, बरहुकूम सनदा. छ ३ जिल्काद रवाना छ ९ मिनहू. भवानजी व मायाजी जासूद जथे, बावाजी नाईक रवाना कोंकणांत कागदाचे लखोटे सुमार.

१ जंजिरे, रत्नागिरीस, मोराजी शिंदे यासी.
१ चिमणाजी माणकर, नामजाद अंजनवेल यास.

२

जोडी रोजमुरा सरकारांतून आदा बाबाकडील आला नाहीं. दस्तक छ १० जिल्कादचें नवीशार करून देणें, ह्मणोन बाबाचें नांवनिशीचें फेरिस्त अलाहिदा आहे १.

सदाशिव गोसावी वरूडकर यांस पत्र, राजश्री शास्त्रीबाबाचे नांवें कीं, तुह्मीं करार करून गेला कीं, खासा स्वारी पुण्यास दाखल जाहलीयावरी हाजीर होऊं. ऐसें असतां स्वारी येऊन दोन महिने जाहले. त्रिंबक गोसावी मागती फिर्याद जाहला आहे. याजकरितां पत्रदर्शनीं निघोन येणें. ढील केलीयास सरकारचा कराला होईल म्हणोन, कृष्ण ब्राह्मण याजबरोबर रवाना. छ ३० माहे जिल्कादी. पत्र १.

छ २७ जिल्कादी. खासगी बरहुकूम पत्र, छ १७ मिनहू सिदू गंगाधर खेडकर यानें आपली सून जिवें मारिली त्याचे चौकशीविशी. पत्रें.

१ तसलमात तुकोजी लांडगे जासूद जथे बावाजी नाईक, राजश्री माधव विश्वनाथ यांस सातारा.

१ तसलमात राघोजी गवळी व राणोजी लांडगा जथे बावाजी नाईक, रवाना कल्याण.

१ बाजी शंकर सुभेदार कल्याण, सुनेचा बाप बदलापुरीं आहे, त्यास त्याचे सहित्दां रवाना करणें ह्मणोन.

३

मौजे आथूरणें व कळंब, परगणे इंदापूर, येथीलें शिवेचा कजिया आहे त्याबद्दल.

१ राजश्री देवराव मेघश्याम यांस पत्र कीं, मौजे आथूरणेकर व कळंबकर या दोन्ह गांवीचे पाऊणशें वर्षांपलीकडील थळझाडे व कजे लागवणसुद्धां, पाटील, कुळकर्णी हुजूर रवाना करणें व परगणें मजकूरचे देशमुख, देशपांडे यांसी ताकीद करून, या दोहीं गांवचें व लासुरणें गांवचें एकूण तीन गांवचें थळझाडें

शिवेच्या कजियाचे कागदपत्र, जे असतील ते त्यांजपाशीं देऊन, रवाना करणें ह्मणोन. पत्र.

१ मौजे लासुरणें, परगणें मजकूर यांस आज्ञापत्र कीं, मौजे आथुरणी व कळंब या दोहीं गांवचे शिवधडेकरी तुह्मीं आहां व साक्षीदारही आहां, तरी मौजे मजकुरचें जुनें थळझाडें पाऊणशे वर्षांपलीकडील घेऊन येणें, ह्मणोन ताकीदपत्र.

२

सदरहू दोनीं पत्रें रवाना रसानगी छ २ माहे जिल्हेज जासूद आवजी जथे भिकाजी नाईक दोहीं वाद्यांकडून रुपये ६ साहा देऊन रवाना केले. पत्रें २.

पत्रांत

लाव्ये यांनीं पुण्यांत येऊन, यजुर्वेदी ब्राह्मणासी दोन तीन शरीरसंबंध केले. तें वर्तमान सालगुदस्तां हुजूर कळलीयावर, चौकशी मनास आणितां, धोंडाजी बिन मुधाजी लाव्या यानें गणेश कृष्ण सराफ माध्यन्दिन यासी आपली कन्या देऊन लग्न केलें! त्यास चार पांच वर्षें झालीयावर, धोंडाजी मजकूर लाव्या ऐसें गणेश कृष्ण यासी कळलें. परंतु ते गोष्टी प्रगट न करतां स्त्रीचा अंगिकार करून राहिला. त्या लग्नास आठ दाहा वर्षें जाहलीं. त्यावरी सालगुदस्तां गोविंद बिन नरहर मालेराव व रघुनाथ बिन शंकराजी व रामाजी बिन जनार्दन तुरे, वस्ती मौजे गोलेगांव, परगणे दौलताबाद, श्रीधर बिन नागेश बारखाना, वस्ती मौजे देवळाणें, परगणे मजकूर, एकूण पांच असामी लाव्ये यांनीं पुण्यास येऊन, पेशजी गणेश कृष्ण याजजवळ शरीरसंबंध केला. त्याचा दाखला दाखवून, रघू लाव्या याची कन्या परशराम ब्राह्मण यजुर्वेदी, वस्ती पुणें यांस दिल्ही. व श्रीधर लाव्याची बहीण, कोंडभट यजुर्वेदी ब्राह्मण, वस्ती विठलवाडी नजिक पुणें यांस दिल्ही. गणेश मजकुरानें, हे आमचे शरीरसंबंधी ह्मणोन, खोटी साक्ष दिल्ही. त्या अन्वयावरून सदरहू लग्नें दोनीं जाहलीं. त्याउपरी आगांतुक ब्राह्मणाच्या मुखें, हे लाव्ये गोळक ऐसें कळलें. त्यावरून अवघ्या सदरहू आसाम्या हुजूर आणून, शोध मनास आणितां, ब्राह्मणासीं व यासी शरीरसंबंध होत नाहीं व अन्न व्यवहार होत नाहींत. हे गोळकसे दिसों लागले. यांनीं आपली जात लपवून, ब्राह्मणास मुली दिल्हा, हें अकर्म केलें. या अपराधाबद्दल, सदरहू अवघ्या लाव्यांपासून, गुन्हेगारीचा खंड घेऊन, अटकेंत ठेविलें. आणि परशराम सराफ व कोंडभट यजुर्वेदी ब्राह्मण यांजपासून, राजदंड घेऊन, धर्मशास्त्रमतें प्रायश्चित्त देऊन, शुद्ध केलें. लाव्याच्या मुली लाव्याजवळ राहिल्या. याजकरितां गोविंद लाव्या हा खाशा वाड्यास नमस्कारोक्त प्रदक्षिणा नित्य करूं लागला. त्यावरून मनास आणितां सदरहू लाव्यांनीं विदित केलें कीं, पूर्वीं आह्मीं उत्तम यजुर्वेदी ब्राह्मण होतों. त्यास मेघोराम यानीं वेरूळक्षेत्रीं कोटि होम केला, त्यास एकशें पंधरा वर्षें जाहलीं. त्या यज्ञांत, कृष्णाजी ब्राह्मण उपनाम लाव्या यास आमंत्रण सांगितलें; परंतु तो न येतां, पूर्णाहुती

जाहली. व ब्राह्मणाच्या पंक्ति एक दोन भोजन करून उठल्या. कृष्णाजी आला तो मागून, भोजन न करी रुसोन चालिला. तेव्हां समस्ता ब्राह्मणाहीं भोजनाचा आग्रह केला. परंतु कृष्णाजीनें ऐकिलें नाहीं. त्या हट्ट, निग्रहामुळें, समस्ता ब्राह्मणाहीं, कृष्णाजी लाव्या व त्याजबरोबर जितके यज्ञमंडपांतून, गृहस्थ व भिक्षुक उठोन गेले तितक्यांस बहिष्कृत केलें. त्या दिवसापासून कृष्णाजी व आह्मी, चाळीस पन्नास असामी उठोन गेले तितकियांस कृष्णाजीच्या समागमामुळें, अवघ्यांसच लाळे ऐसें अभिधान ठेऊन, ब्राह्मण्यास अपकार केला. परंतु आह्मी गोळक नव्हे. अद्यापही वेरूळकर क्षेत्रस्थ ब्राह्मण, आमच्या घरी येऊन, वेदोक्त कर्म चालवितात. आणि आपल्या हातें स्वयंपाक करून, भोजन करितात. आणि आह्मीं त्यांच्या घरास गेलीयास, आपंक्त पात्रे घालून, आमचा त्यांचा वाढपी एक, मागून वाढप एक धार एक पात्रानें होते. आह्मांत वेदाध्यायनी ब्राह्मण आहेत. त्यांनें तीर्थ व गंधही दाहा बारा वर्षांपलीकडे घेत होते. अलीकडे घेत नाहीत. याप्रकारें आचार चालतो. परंतु पूर्वी आह्मीं ब्राह्मण होतो. अलीकडे या अभिशापानें, घरें मोडत मोडत वीस पंचवीस राहिलीं. याकरितां गोत्रघाटितामुळें, शरीर-संबंध करावयाचा विलाज, आपला आपल्यांत राहिला नाहीं. पुरुष लग्नाव्यतिरिक्त राहतात, परंतु मुली उपवरी जाहल्यावरी काय करावें! याजकरितां वेरूळचा पूर्वील दाखला मनास आणून, साहेबीं आमचा अपराध मुक्त करून, आमचा उद्धार करावा. ह्मणोन तपशिलें विनंति केली. त्यावरून तुह्मांस हें पत्र सादर केलें असे; तरी याचीं घरें वेरूळ प्रांतीं सदरहू गांवीं आहेत, सर्व दाखला तेथे पुरेल, याजकरितां वेरूळचे शिष्ट ब्राह्मण व जमेदार वगैरे वृद्ध यांसी हे तपशिलवार सत्य सुकृत, त्यांचे माथां ठेऊन पुसावें. एकशें पंधरा वर्षांपलीकडे अन्नव्यवहार व शरीरसंबंध, ब्राह्मणासी व यांसी कसे चालत होते व पहिले हे कोण? अली-कडे आरोप आला कीं काय? आरोप यावयासी कारण काय? व अलीकडे हा काळ-पावेतों ब्राह्मणाची व यांची चाल कसकशी होत आहे? ब्राम्हण किंवा गोळक किंवा कोण हा शोध पुर्ता करून, ठिकाण लावून देतील त्याप्रमाणें, पूर्वील संबंधाचाही शोध करून, तपशिलवार ते सांगतील त्याप्रमाणें, त्या क्षेत्रस्थांच्या हातें चौकशीनें लिहिलें घेऊन, वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. मनास आणून आज्ञा करणें ती केली जाईल. ह्मणोन राजश्री नारो बाबाजी नामजाद, परगणे नेवासे वगैरे महाल यास पत्र. छ २६ जिल्काद बरहुकूम रवानगी. छ ५ जिल्हेज, शंकराजी बिन बाळोजी जासूद जथे भिकाजी नाईक, रोजमुरा परभारा लाव्याकडून रुपये ६ देऊन, रवानगी केली १.

खंडोजी बिन सुलतानजी जासूद जथे चांगोजी नाईक यांस रोजमुरा आषाढ मास, रुपये.

माहे जिल्कादचा रोजमुरा.

२॥॰ बहिरजी पांढरे याजकडून.

२॥॰ येसोजी व शहाजी बाबर याजकडून.

५॥॰

एकूण चिट्ठी छ २ माहे जिल्हेज, अधिक श्रावणमास, शुद्ध चतुर्थी, साक्षीदार पुळुंजेचे पाटिलकीच्या कजियाच्या निवाडीयाबद्दल आणिले, त्याजवर रखवालीस सबब मशारनिल्हेकडून रोजमुरा देविला. ५॥ रुपये.

छ ८ माहे जिल्हेज, बहिरजी पांढरे याचा व येसाजी व शहाजी बाबर याचा, मौजे पुळुंज, येथील पाटिलकीच्या निवाड्याबद्दल साक्षीदार हुजूर आणविले, त्यापैकीं दया महार, मौजे मजकूर यास हगवण लागली, सबब औषधास रुपये ।- पावला, खंडोजी जासूद याजजवळ देविला त्याच्या चिट्या.

॥ बहिरजी पांढरे.

॥ येसाजी व शहाजी बाबर.

।-

रघुनाथभट बिन द्वारकाभट, वस्ती कसबे पुणें याच्या घरीं, गोविंदा ब्राह्मण यानें चोरी केली. गोविंदा समागमें अभक्ष होता. त्याच्या संशयाबद्दल रघुनाथभट व त्याची स्त्री सोयराई व गोविंदा यास, राजश्री बाबुराव फडणीस यानीं आणून, चौकशी करितां अभक्ष गोविंदा जवळ होता. रघुनाथभट व त्याचे स्त्रीकडे दोष येविषयींचा नाहीं. म्हणून राजश्री बाबूराव यानीं रामकृष्ण चोपदार याजबरोबर सांगोन पाठविलें. त्याजवरून रघुनाथभट यांचे घरीं पूर्ववत प्रमाणें अन्न व्यवहारें करीत जाणें म्हणोन, शास्त्रीबावांचे नांवाचीं पत्रें.

१ मल्हार जोशी वेव्हारे व नाना लेले व सखु भणंग यास, छ ७ जिल्हेज.

१ शिव जोशी व समस्त वेव्हारे, उपाध्ये व महाजन, कसबे मजकूर यास, छ १२ जिल्हेज.

२

छ १२ जिल्हेज, बहिरजी पांढरे याचा व येसाजी व शहाजी बाबर याचा, मौजे पुळुंज येथील पाटिलकीच्या निवाडीयाबद्दल साक्षीदार दया महार आणविला, त्यास हगवण लागली सबब तो आपले सोयऱ्याचे घरीं मौजे——येथें जात आहे. त्यास औषधास रुपया १ एक देविला आहे. तरी कानोजी जासूद याचे गुजारतीनें रुपया १ एक देणें, म्हणोन चिट्ठी तसलमात कानोजी. १.

श्री

यादी बार पत्रें न्यायाधीशाकडील सुरुसन इसन्ने सबैन मया अलफ. माहे सफर, वैशाख मास.

राजश्री पंतप्रतिनिधी किल्ले विशाळगड यास, शास्त्रीबावानें नांवें पत्र कीं, जिवभट व गंगाधरभट आठल्ये याचा व बाळभट आठल्याचा, मौजे शिपोशी, तर्फ देवळें, येथील इनामाचे विभागाचा कजिया लागोन, मनसुबी सरकारांत पडली आहे. त्यास येविषयींची मनसुबी पेशजी आपणाकडे पडली होती. तेव्हां हरदो बायांचे असल कागद पत्र आपण

घेतले आहेत म्हणून, हरदो वादयांनीं सांगितलें. त्यावरून आपणास लिहिलें आहे. तरी याचे कागदपत्र अस्सल घेतले असतील त्याचें फेरिस्त घालून, आपले माणसाबरोबर सरकारांत पाठवून द्यावे. म्हणून छ १ रोजचें

पत्र १.

तसलमात जिवभट.

श्री

विनंती उपरी राजश्री भिकाजी राजे शिर्के व लक्ष्मणजी राजे शिर्के, या उभयतांचा कोंकणांतील वतनाचा कजिया आहे. त्याचा निवाडा पुण्यांत होत आहे. त्यास राजश्री रामशास्त्री यांचें पत्र आलें कीं, पेशजी कैलासवासी शाहूमहाराज यांचे वेळेस, कान्होजी शिर्के यानीं श्री कृष्णेचें दिव्य केलें. तेव्हां दिव्यास खरा, खोटा कोण जाहला तें व राजपत्रें फरून दिल्हीं तीं, दफ्तरीं बार असतील तीं लेहून काढून पाठवणें. तरी मजमूचे दफ्तरी बार असेल ते लेहून पाठवावें. रवाना छ २ जमादिलावल, सुरुसन इसन्ने समानीन मया व अलफ, हे विनंती.

श्रीगजानन.

स्वारी राजश्री बापुजी गणेश ताहा मोकदम, मौजे भाडळें, संमत कोरेगांव, प्रांत वाई, सुरुसन तिस्सा मयातेन व अलफ, राजश्री हैबतराव बिन नरसिंगराव राजे घोरपडे, मोकदम पाटील मौजे मजकूर हे, मौजे मजकूर येथील मोकदमीसंबंधें आपला मानपान, इनाम वगैरे घेऊन, गांवची वहिवाट करीत असतां, दरम्यान राजश्री बाळोजी व जनकोजी राजे घोरपडे, पाटील मौजे मजकूर यानीं श्री क्षेत्र काशीहून फलकचे येथील इंग्रजांचें पत्र व श्रीमंत राजश्री अमृतरावसाहेब यांचें पत्र, ऐसीं दोन पत्रें अजम कर्नेल क्लोज् बहादुर यासी पुण्याचे मुक्कामास आणिलीं, त्यावरून कर्नेल यांनीं हैबतराव यासी बोलावणें केलें. त्याजवरून त्यांनीं आपले कनिष्ट बंधु, राजश्री कृष्णाजी राजे घोरपडे यांस पुण्यास पाठविलें. तेव्हां कर्नेल यांनीं उभयतां वादी यांची मनसुबी, राजश्री खुशरजी शेट मोधी याजकडे सांगोन, आणखी पंच नेमून देऊन, पंचाईत करविली. त्यांत बाळोजी व जनकोजी खोटे जाहले. त्यांचे चिरंजीव बाबाजी व त्याचे बंधु सटवाजी व जोत्याजी व बहिरजी घोरपडे हे पळोन गेले. ये विषयी—कर्नेल यानीं आम्हांस लिहून, तुम्हीं पेशजी मनसुबी केली आणि हैबतराव यांस पत्रें करून दिल्हीं, त्याची चौकशी येथें केली. त्यास तुमच्या व आमच्या करण्यास ताळा पडोन, हैबतराव खरे ठरोन, बाळोजी व जनकोजी वगैरे वादी खोटे पडले म्हणून, त्याजवरून हे सनद तुम्हांस सादर केली असे. तरी हैबतराव घोरपडे हे मोकदमीसंबंधें, मौजे मजकूर येथील मोकदमी पाटिलकीची वडील पेशजीपासून वहिवाट यांची आहे. त्याप्रमाणें हे आपला मानपान, कुलबाब, कुलकानू सदरहू वतनसंबंधें घेऊन, कामकाज करितील व प्राचीन इनाम, पांढरीचा मळा बिघे ८३ तीन व चावर पैकीं बिघे ८७ सात, एकूण दाहा बिघे आहे. येविषयीं पेशजी नारायणजी घोरपडे यानीं सरकारांत गैर-

वाका समजावून सनद करून घेतली होती. ती जमीन इनाम हैबतराव याची आहे. ती वगैरे शेत, मळे व घुगरी व कानु, कायदे याचे हे वशपरंपरेने उपभोग करितील. तुम्ही तेथील सर्व वतनदार व याचे निरादर भाऊबंद, आपलाला हिस्सा भाऊपण्याचा घेऊन, याज खाले वर्तत जाणे. जाणिजे. छ. १ सवाल.

श्री

श्रीमत् क्षत्रिय कुलवतंस महाराज राजश्री——छत्रपती स्वामींचे सेवेशी.

विनती सेवक बाजिराव बल्लाळ प्रधान, कृतानेक विज्ञापना सेवकाचे वर्तमान तारीख ७ २४ सफर पावेतो स्वामीचे कृपाटक्षिकरून यथास्थित असे विनती. पुरदरे व अने याचा कर्यात सासवड येथील देशकुळकर्णाचा व कसबे मजकुरच्या कुळकर्णाचा कजिया होता, त्यास महाराजानी कुल गावचे देशमुख व पाटील व बारा बलुते यास हुजूर नेऊन क्रिया घालून पुशिले की, वतनदार खरे कोण ? त्यास समाकुळ पाढरीने साक्ष पुरदरे याची दिल्ही. त्यास क्रिया गावकरी यानी केली ते समयीं दशरात्र पचरात्र नेमिली, तेव्हा गावकरी यानी स्वामीजवळ बोली सोडविली की, मावजी नाईक देशमुख व मल्हार तुकदेव पुरदरे याची स्री दोघें दुखणियास पडली आहेत. तीं मेली तरी आपणास क्रिया नाही. याखेरीज कोणाचे घरी काही दगा जाहला तरी (तो) खरा; ऐशी बोली केली होती. त्यास मावजी नाईक देशमुख जाया जाहला होता. तो मृत्य पावला. आणखीं कोणाचे घरीं काही दगा झाला नाही. विदित जाहलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## १४. वृत्तिपत्र.

सिद्धेश्वरभट बिन शिवभट धर्माधिकारी, क्षेत्र प्रवरा संगम, यास वृत्तीस पत्र दिल्हें ऐसेजे, भवानीशकर बिन सिद्धेश्वरभट इबिन हरभट याने हुजूर येऊन विदित केले की, सिद्धेश्वरभट बिन हरभट धर्माधिकारी, क्षेत्र प्रवरा सगम, यास पुत्र सतान नाहीं. ते मृत्य पावले. त्याउपर त्यानी स्री येसुबाई होती तिने आपण, तिचे लेकीना पुत्र दोहित होतो तो, दत्तविध करून, आपला पुत्र केला. आपला व्रतबध, विवाह, शाडिल्य गोत्री केला. आपण सिद्धेश्वरभट बिन हरभट याचे वृत्तीचा उपभोग करितो. त्यास सिद्धेश्वरभट बिन शिवभट धर्माधिकारी, क्षेत्र प्रवरा सगम, हे आपणास ह्मणतात की, तुजला येसुबाईने दत्तविध करुन पुत्र घेतला नाहीं. तुजला सिद्धेश्वरभट बिन हरभट याचे वृत्तीशीं सबध नाहीं. ऐसे म्हणुन, आपणासी व्यवहार सांगतात. तरी सिद्धेश्वरभट बिन शिवभट यास आणून आपला इनसाफ केला पाहिजे, म्हणून विदित केले. त्यावरून सिद्धेश्वरभट बिन शिवभट यास हुजूर आणून, त्यास पुरशीस करिता त्यानी विदित केले. आपल्या विभागी सिद्धेश्वरभट बिन हरभट होता. त्यास पुत्र नाहीं. तो मृत्य पावला. त्याचे लेकीस पुत्र भवानीशकर आहे. तो म्हणतो की, आपणास सिद्धेश्वरभट बिन हरभट याची स्री येसुबाईने दत्तविध करून पुत्र घेतले. आपला व्रतबध, विवाह, शाडिल्य गोत्री केला, आणि तिचे आपल्या

विभागास अधिकारी केलें, ऐसें भवानीशंकर म्हणतो; परंतु आपणास हें ठावकें नाहीं आपणास पुसोन घेतला नाहीं. आपले वंशीचा पुत्र घ्यावा, तोही पिता असतां घ्यावा. बायकोस लेकीचा पुत्र घ्यावयास संबंध काय ? तथापि ये गोष्टीचे गांवामध्यें कोणी साक्ष नाहीं. भवानीशंकर याचा आपला वेव्हार वीस पंचवीस वर्षे होत आला. त्याचे कागदपत्र आपणाजवळ औरंगाबाजेचा महजर, व ठाणें नेवासें येथील महजर व भवानीशंकर याचा बाप, भास्कर नरहर याचें पत्र कीं, आपण पुत्र येसुबाईस दिल्हा नाहीं. मतबंध आपण आपले गोत्रीं केला, ऐसें पत्र व भवानीशंकर याचें येजितपत्र ऐशीं चार पत्रें आहेत. तीं पाहून न्याय करावा म्हणून विनंती केली. त्यावरून भवानीशंकरास पुरसीस करितां त्यानें विदित केलें कीं, आपले साक्षी गांवीं आहेत, त्यांच्या सड्या आणवाव्या म्हणून. त्यावरून गांवास पत्रें पाठवून तेथून सड्या आणविल्या आणि तुम्हां उभयतांस श्री स्वामीमठ कोल्हापूर यांकडे न्यायास पाठविलें, कीं धर्मशास्त्रप्रमाणें निवाडा करावा त्यावरून त्यांनीं सड्या मनास आणितां सड्यावरून निर्वाह न होय ऐसें झालें. तेव्हां तुम्हीं मान्य झालेत कीं, भवानीशंकर याचे प्रतिपक्षी बाळभट गोफे, हे त्याचे निसबत आपणासी, वेव्हार सांगतात. यांनीं श्री कृष्णेमध्यें शिरोन क्रिया करावी कीं, आपणा देखत दत्तविध. होऊन, शांडिल्य गोत्रीं लाविला. ऐसें बोलोन क्रिया करावी, आपण मान्य आहों. ऐसें बोलिलेत. त्यावर बाळभटाहीं मान्य केलें, परंतु श्री स्वामी यांनीं तो विचार मोडिला कीं, हे गोष्टी आपल्या स्थळास योग्य नाहीं. तुम्हीं उभयतांदी, भले ब्राह्मण, अग्नहोत्री आहां. तुमचे प्रतिष्ठेस क्रिया योग्य नव्हे. याउपर येसुबाईनें पुत्र घेतला तो तुम्हींच घेतला, ऐसें बोलोन आपण सांगों तें ऐकावें. ऐसें उभयतांसही मान्य करून, तुम्हां उभयतांस सिद्धेश्वरभट बिन हरभट याचे वृत्तीचा विभाग करून दिल्हा. बितपशील बरहुकूम निवाडपत्र:—

सिद्धेश्वरभट बिन शिवभट यासी विभाग.

सिद्धेश्वर भट बिन हरभट याची वृत्ती आणे. कुळपुरोहितकीचे यजमान निमेनिम कलम १.

८ ⁓ मूळ वृत्ती
।· सखो बल्लाळ गोत्रज यांजबद्दल खरींदी केली वृत्ती.
।⁓

पैकीं निमे ८⁓।
बद्दल त्रिंबकभट ८।
खोदयाबद्दल वान घेतलें होतें घर तें दिल्हें कलम १.

भवानीशंकर यास वाटा दिल्हा.

सिद्धेश्वरभट बिन हरभट याची वृत्ती आणे. कुळपुरोहितकीचे यजमान निमेनिम कलम १.

८ ⁓ मूळ वृत्ती
।· खरींदीबद्दल सखो बल्लाळ गोत्रज.
।⁓

पुरातन सिद्धेश्वरभट बिन हरभट याचें घर दिल्हें १.

पैकीं निमे भवानी शंकर ८⁓।.

त्रिंबकभट बिन महादेवभट याची वृत्ती, त्याच्या बायका आहेत तों त्यांनीं खावी.

त्याजमाघारे सिद्धेश्वर भट बिन शिवभट यानीं निमे ॥. खावी. त्यामध्यें ॥. भवानी शंकर यास निमे द्यावी. त्यांचीं घरें दोन आहे(त) तीं सिद्धेश्वरभट बिन शिवभट यानीं घ्यावीं. भवानीशंकरास घरासी संबंध नाहीं कलम १. त्रिंबक भट बिन महादेवभट याचे यजमान निमेनिम १.

वरहुकूम ॥. त्रिंबकभट बिन महादेवभट याजबद्दल. त्रिंबकभट बिन महादेव भट याचे घरासी संबंध नाहीं.

त्रिंबकभट बिन महादेवभट याचे यजमान निमेनिम कलम १.

येणेंप्रमाणें निवाडा करून, निवाडपत्र तुह्मांस करून दिल्हें. तें पत्र तुह्मीं आणून दाखविलें, त्यावरून हें पत्र तुह्मांस करून दिल्हें असे. तरी सदरहू निवाडपत्राप्रमाणें सिद्धेश्वरभट बिन हरभट याची वृत्ती निमे तुह्मीं अनुभवून सुखरूप राहणें. निमे भवानीशंकर अनभवील. याउपर तुह्मांस त्यास भांडावयास प्रयोजन नाहीं. ह्मणून सिद्धेश्वरभट बिन शिवभट धर्माधिकारी याचे नांवें सदरहूप्रमाणें लेहून दिल्हें, पत्र १.

एकूण एक पत्र देणें.

---

## १५. महजर.

पारकिर्द छ. २६ रबिलाखर, सन तिसा.

महजर ब तारीख ५ माहे रबिलाखर, हजीर मजालसी ठाणें, परगणे कासेगांव, सरकार आसदनगर उर्फ आकलोज, सुभे दारूलजफर विजापूर सुरुसन आर्बा तिसेन हजार १२०३ सन ३७ जलुसवाला.

बेहुजूर.

बहिरजी मुराळे शिक्का असे.

राजमुद्रा.
खंडेराव बळवंतराव नायब फौजदार परगणे मजकूर शिक्का असे.

दत्ताजी राजे जाधव साहेब मदार जमा सुभानजी राजे जहागीर कसबे मजकूर शिक्का असे.

नरसो श्रीनिवास रत्नखाना सरकार शिक्का असे.

रामजी गोविंद दिवाण मौजे तावशीचा जहागीरीबद्दल शिक्का असे.

गोविंद व दत्ताजी देशमुख परगणे मजकूर शिक्का असे.

मल्हार रघुनाथ रोखदार खलास सेरफ व जहागीर तुकोजी जाधव देहाय परगणे मजकूर शिक्का असे.

संताजी पाटील मोकदम कसबे मजकूर निशाणी नांगर असे.

शिक्का असे.

सताजी पाटील मोकदम मौजे तावसी निशाणी नांगर.
खंडशेट व सांतशेट म्हेतरी जुळाई कसबे मजकूर.
भिकाजी लालकुंभ तुकोजी गंगथडा महात पालिगोड.
भिक्या लिगाडे.
मलापा तेली म्हेतरे.
सुभानजी व मकाजी नाईक लोहकरे परगणा मजकूर.

निराजी नरसिंह देशपांडे परगणा मजकूर निकलम.
बंदशेटी आज जावती राचापा शेट्या कसबे मजकूर.
मलकोजी व मानाजी भोंशा रयान कसबे मजकूर.
मकाजी जोग माळी व संतु थेटक माळी कसबे मजकूर.
रेवाजी व जिवजी पोतदार कसबे व परगणा मजकूर.
सिदप्पा महाजन कसबे मजकूर.
मोकदमानी मौजे खरडी नांगर निशाण असे.

संताजी पाटील मोकदम मौजे रांजणी निशाणी नांगर.
सटवाजी चौगुला मौजे मथाडे निशाणी नांगर.
अंबाजी पाटील संगेवाडी निशाणी नांगर.
बाजी पाटील मोकदम शिवेवाडी निशाणी नांगर.

शिदोजी पाटील मोकदम मौजे नखतगांव नांगर.
आप्पाजी पाटील एखलासपूर नांगर.
सखाजी पाटील मौजे शिरगांव नांगर.
आबाजी आनंत कसबे काळे जोतिषी प्रांत फल्हाड.

सोनजी यशवंतराव पाटील मोकदम मौजे वाखरे निशाण नांगर.
चहिरजी पाटील मोकदम मौजे चिंचोली परगणा सांगोले नांगर.
जावजी पाटील मोकदम मौजे शिरढोण.
रामोजी संधानसिंह पाटील मौजे मांजरी नांगर.
आवाजी मेहतर.
दरजी निशाण कातर.
बाबाजी पाटील मोकदम मौजे सरकोळी निशाण नांगर.
रघोजी पाटील मोकदम मौजे आणवडी.
आमाजी व संताजी पाटील मौजे, शिरबावी परगणा मजकूर नांगर.
मकाजी पाटील मोकदम मौजे टाकळी.

या विद्यमानें झाला महजर ऐसाजे:--क्षेत्र पंढरपुरचे बडवे व बेणारे या हरदोजणामध्ये श्री देवाची पालखी व पालखीचें उत्पन्न घोडे वगैरे वाहनेंबदल गगशा होता ह्मणून पेशजी दखणी मुवतीस शाहापूर पेठेस हरदोजणांचा निवाडा झाला, ते वक्ती मरहम इनसाफमुळें बडवे खरे व बेणारे खोटे ह्मणून महजर करून दिल्हा होता. त्या बरहुकूम

बडवे मजकूर पालखी व पालखींचे उत्पन्न घोडे वगैरे वाहन भोगवटा खात आले असता, हल्ली राजश्री बहिरजी राजे पाढरे फौजदारसाहेब यांचे आमदानीमध्ये विसाजी देशमुख भोमकर याची लेक नारो रावोजीची सून यानी वावादत्ताचे घोडे आषाढ वद्य द्वितीयेस श्री देवास वाहिले ते बडवे घेता बेणारी यानी दूरहाई दिधली जे, पालखी व पालखींचे उत्पन्न घोडे वगैरे वाहने आपली असता तू कायबदल घेतोस ? म्हणून त्यावरून हर-दोजण भाडत. ठाणे फौजदारसाहेबाचे कचेरीस फिर्याद झाले जे आपला निवाडा करणे. पेस्तर इनसाफ व्हावा. तो अगोदर महादभट बेणारा जाऊन बाळकृष्ण बेणारी यास हकि-कत जाहीर करून बापुजी महादेव जहागीरदार क्षेत्र मजकूर व केशवराव वकील हुजूर कचेरी यास रदबदल करून सानीसीचे कागद फौजदारसाहेबास व देशमुखास घेऊन आला जे, घोडे अमानत करून हरदोजणाची बुनियादी पाहून बरहक्क इनसाफ करणे. ज्याचे होईल त्यास देणे म्हणून. त्यावरून फौजदारसाहेबी देशकास बोलावून फर्माविले की, बेणारी यानी हुजरुन कागद आणिले आहेत, याबद्दल हजीर मजालसी बैसून घोडे अमानत करून हरदोजणाचा इनसाफ करावा म्हणून गोदजी देशमुख परगणा मजकूर याच्या घरी घोडे अमानत ठेऊन बरहक्क निवाडा करावयाचा तह केला. हे वर्तमान पाहता बडवी-यानी मनामध्ये दहशत धरिली जे, बेणारी यानी हुजरुन कागद आणिले आहेत. जे हाचे तेव्हा इनसाफ बरहक्क होणार नाहीं याबद्दल आपणही हुजूर जाऊन कागद आणावे ह्मणून आपल्या आपल्यामध्ये तह करून जिवाजी बडवे व कोन्हेरी बडवे याचा भाऊ कुसाव्वा बडवा हुजूर जाऊन बापुजी महादेव जाहागिरदार क्षेत्र मजकूर यास रदबदल करून कागद घेऊन आले जे, क्षेत्र मजकुरास जाऊन हरदोजणाचे बुनियादीचा शोध पाहोन ज्याचे घोडे होतील त्यास देणे म्हणून. त्याजवरून हजीर मजालसी दिवाण व देशक बैसोन हरदोवादीयासी बोलावून आणून हकिकत पुसता त्यानी तकरिरा दिधल्या बितपशीलः—

तकरीर कर्दे बनाम महादभट बेणार व समस्त बेणारे क्षेत्र पढरपूर लिहून दिली तकरीर ऐसीजे, श्री पाडुरग मूर्तीचे गरुडवाहन अनादिसिद्ध आपले व त्याचे उत्पन्न आपले आपण खातो आणखी श्रीमूर्तीस भक्ती समर्पिलिया पदार्थाचे विभागी वेगळाले आहेत. त्यामध्ये पालखी व घोडे वगैरे वाहने आपली आपण घेत असता बडवे म्हणतात कीं, आपलीं. ही सदरहू त्याची नव्हेत आपली ऐसी रुजू करून देऊ जरी नेदू तरी गोताचे खोटे व दिवाणचे गुन्हेगार. केली तकरीर सही.

तकरीर कर्दे समस्त बडवी यानी क्षेत्र पढरपुर लेहून दिल्ही तकरीर ऐसीजे, सालवाद मातकदम पिढीदरपिढी पालखी व पालखींचे उत्पन्न घोडे वगैरे वाहनें वडीलावडील खात आलों. दराम्यान बेणारे उभे राकोन खलेल केले जे, पालखी, पालखींचे उत्पन्न आपले ह्मणून हुजूर जाऊन फिर्याद केली. त्यावरून आपणास हुजरून तलब केली. आपण हुजूर

जाऊन निवाडीयास उभे राहिलो. आपण व बेणारी यानी तकरिरा व राजीनामे दिल्हे जे देशक व क्षेत्रीचे लोक व हक्क जवाहिरीचे, पाटील हे जे धर्मता सालाबाद भोगवटा पाहोन लिहितील, त्याप्रमाणे हरदोजण राजी त्यावरून सभानायक बैसून विचारणा करून कारकुनास व देशकास हुजरून लिहिले आले जे, क्षेत्र मजकूरचे लोक व हक्क जवाहिरीचे लोक मेळवून त्याचे डोईवरी इमान शपथपूर्वक घालून ते जे आपले इमाने सागतील ते हुजूर लेहून पाठवणे म्हणून. त्यावरून देशक व गावींचे लोक व हक्क जवाहिरीचे पाटील बैसून पुसिले ते जे बोलिले ते, हुजूर लेहून पाठविले. त्यावरून हुजूर सभानायक बैसून मनास आणिता आपला भोगवटा खरा झाला. भोगवटा बेणारी यास नाही त्यावरून आपले वडील खरे करून पालखी व पालखीचे उत्पन्न आपले दुमाला करून महजर करून दिल्हा. तो आजितागाईत पालखी व पालखीचे उत्पन्न खात आलो. हल्ली घोडे आले त्यास बेणारी यानें खलेल केले. तरी आपण सालाबाद पालखी व पालखीचे उत्पन्न घोडे घेत आलों बेणारी यास सबध नाही केली तकरीर सही.

सदरहूप्रमाणे तकरिरा लेहून घेतल्या. मग हजीर मजालसी बोलिली जे, पेशजी निवाडे झाले आहेत ऐसी तकरीर केली आहे. तरी पेशजीचे महजर अगर बाजे कागद जे असतील ते तमाम वाखवणे म्हणून त्यावरून हरदो वादीयानी पेशजी वखणी मुदतीस शहापूर पेठेस दोनदा निवाडे झाले होते त्या महजराच्या नकला आणून दाखविल्या. त्याची हकिकत मनास आणिता शाईदी क्षेत्रावरी आली. म्हणून हरदूजणास पुसिले जे तुम्ही निवाडीयास क्षेत्री राजी आहा की नाही म्हणून. त्यावरून बडवा बोलिला जेसा शेवकवर्ग देवाचे त्यात बेणारी यात समा आहेत. ते वेगळे करून समस्त क्षेत्रास राजी. बेणारा बोलिला जे आपणही ताटे थिटे आराध्ये वेगळे करून समस्त क्षेत्रास राजी. त्यावरून हजीर मजालसी बोलली जे, क्षेत्रास राजी ह्मणून राजीनामा देणे मग क्षेत्रा जाऊन इनसाफ करिता हरदो वादीयाचे जो सेवेचा असेल तो वेगळा करून उरल्या लोकास पुसोन इनसाफ करून ह्मणून. त्यावरून हरदोजण वादी राजी होऊन राजीनामे दिल्हे तितपशील.

राजीनामा बनाम महादभट व समस्त बेणारे क्षेत्र पढरपूर लिहून दिल्हा राजीनामा ऐसाजे, आपणामध्ये व बडवीयामध्ये श्री देवाचें वाहन पालखी व पालखीचे उत्पन्न घोडे वगैरे वाहनाबद्दल गर्गशा लागला आहे. ह्मणून साहेबापाशी निवाडीयास उभे राहिलों. त्यास साहेबी फर्माविलें की, निवाडीयास क्षेत्रास राजी किंवा नाही. तरी आपण क्षेत्र मजकूरचे समस्त लहान थोर ब्राह्मण जमा करून चद्रभागेमध्ये आघोळी करून श्री तुळशी डोईवर घेऊन आपलें सत्य सुकृते वदतील आणि ज्याचे ह्मती घोडे देतील त्यानें घ्यावें. यास आपण राजी असोन व दिगर करणार नाही. जर नवदिगर करू, तरी गोताचे खोटे व दिवाणचे गुन्हेगार. लेहून दिल्हा राजीनामा सही.

राजीनामा बनाम समस्त बडवी यानीं क्षेत्र पढरपूर लेहून दिल्हा राजीनामा ऐसाजे, आपणामध्ये व बेणारे क्षेत्र मजकूर यामध्ये श्री देवाचे वाहन, पालखी व पालखीचे उत्पन्न घोडें वगैरे वाहनाबद्दल गर्गशा लागला आहे. ह्मणून साहेबापाशी निवाडीयास उभे राहिलो. त्यास साहेबी फर्मावले की, क्षेत्र मजकुरच्या लोकास निवाडीयास राजी किंवा नाही ह्मणून. तरी आपण क्षेत्रीचे समस्त लहान थोर जमा करून, श्री चद्रभागेची आघोळी करून, श्री तुळसी डोईवरी घेऊन, ते जे आपल्या इमाने सागतील त्यास आपण राजी. जे भोगवटा पाहोन सागतील त्यास आपण राजी असो. नवदिगर करणार नाही. नवदिगर करूं तरी गोताचे खोटे दिवाणाचे गुन्हेगार. लेहून दिल्हा राजीनामा सही.

सदरहूप्रमाणे राजीनामे घेतले. मग दिवाण व देशक व कसबाचे मोकदम व समस्त लहान थोर जमा होऊन क्षेत्र पढरपुरास गेले. तेथे कार्तिक वद्य एकादशीस देवाच्या राऊळामध्ये माधवानदाचे मठी बैसून क्षेत्रस्त लहान थोर जमा केले. त्यामध्ये शेवफवर्ग वाटे, थिटे, आराध्ये निराळे काढून, तमाम तीर्थवासी ब्राह्मण व बकालानी व रयानी व बलुती यानी मेळवून त्यास हजीर मजालसी बोलली जे, बडवीयात व बेणारीयात पालखी व पालखीचे उत्पन्न घोडे वगैरे वाहनेबद्दल गर्गशा आहे, म्हणून हरदोजणा यावे निवाडीयास तुम्हावरी राजी झाले आहेत की, तुह्मी ब्राह्मण, तीर्थवासी. वृत्तीविशी धर्मिष्ठ हा. पापाचा कटाळा करिता. सत्य वदून निवाडा कराल म्हणून तरी तुम्हीं हरदोजणांनी बुनियाद् पाहोन पुरातन पालखी व पालखीचे उत्पन्न घोडे वगैरे वाहने कोणाची; भोगवटा कोणाचा चालत आला आहे या गोष्टीचा पुरा शोध घेऊन, श्री चद्रभागेमध्यें आघोळी करून, फुलकुडात उभे राहून, डोईवरी श्री देवाच्या तुळसी घेऊन आपल्या बेताळिसाचे सुकृते सत्य वदणे. त्यावरून तीर्थवासी ब्राह्मण व बकाल व रयान व बलुते समस्त लहान थोर जमा होऊन, नवाजणाचा इलाखा वेगळा करून श्री देवाचे राऊळी सभामंडपी बैसून, हरदोजणाचे बुनियादीचा शोध घेता पेशाजीच्या निवाडीयाचा प्रसग पटला. ह्मणून पेशाजीच्या हरदोजणापासोन निवाडीयाचे महजर आणविले. त्याप्र त्यानी महजराच्या नकला आणविल्या. त्या वाचून पाहोन तजवीज केली. मग समस्त लहान थोर राजी एक विचार करून, क्रिया करावयाचा तह करून, हजीर मजालशीस येऊन सांगितले. मग हजीर मजालसी उठोन गरूडपारी येऊन बैसून क्रिया करणार नेमिले तितपशील:—

| वैदिक ब्राह्मण ५. | बकालानी ३. |
|---|---|
| १ नरहरभट गोपीनदन. | १ पुडलीक गवां. |
| १ सामराज रूपलग. | १ जिवाजी महार. |
| १ पाडुरग पाठक. | १ गोमाजी चारी. |
| १ वादभट पाठक. | ३ |

१ तमणभट विध्वंस.

५

सराफजी ३.

१ अवजी नाईक पोतदार.
१ रायाजी त्र्यंबकाजी.
१ साबाजी हब्बु.

३

रयानी ८.

१ होनाजी तेली मेहतर.
१ रायाजी सोनार.
१ शिदोजी घेवारी.
१ चौंडाजी सोनार.
१ तुकोजी मेहतर माळी.
१ मकाजी माळी.
१ नारायण सोनार.
१ विठोजी मेढकरी.

८

बलुतीयानी ११.

१ माणकोजी सुतार.
१ शेटी कुंभार.
१ बहिरजी कुंभार.
१ जियाजी शिंपी.
१ निंबाजी न्हावी.
१ शेटी चांभार.
१ भिकाजी सुतार.
१ विठोजी परीट.
१ भिकाजी कोळी.
१ भिकाजी न्हावी.
१ बापु चांभार.

११

एकूण सदरहू तीस मुकरार करून, श्री देवाचें तीर्थ डोईवरी घालून, गळा तुळशीचे दंड घालून, श्री देव समोरील हजीर मजालस बोलली जे, आपल्या वेताळीसांचें सुकृतें वदणें म्हणून. त्यावरून फुलकुंडामध्यें उभे होते, त्यांनीं एक विचार करून नरहरभट गोपीनंदन व माणकोजी सुतार वदले जे, घोडीयाचे बाजें वडवे व बेणारे कधी भांडलां ऐकिले नाहींत. व पूर्वीं श्री देवाची पालखी पाहिली, देऊळींच असे. त्यास वडवे संरक्षण करीत असत. पालखी भरास नेतां बेणारी यानें दुराई दिल्ही. चारी परवी मिळवून देवळांतून नेतां कांहीं दुराई देत नव्हते म्हणून वदले. मग हजीर मजालसीनें फुलकुंडामध्यें उभे होते, समस्तांस निराळें निराळें पुसिलें. ते अवघेही बोलिले जे, नरहरीभट गोपीनंदन व माण-

कोजी सुतार बोलिले तेच सत्य म्हणून शाईदी दिल्ही. मग शाईदी पत्र करून हजीर मजालसीं द्वादशीस उठोन ठाणीयास आले. मग तमाम दिवाण व देशक ठाणा हजीर मजालसी बैसून शाईदी पत्रावरून सभानायकानी विचार केला जे, पूर्वी पालखी देऊळी असता बडवेच सरक्षण करीत होते. पालखी घरास नेता बेणारी यानी दुराई दिल्ही, तरी चारही परवे मिळवून पालखी देवळातून नेत होते तेव्हा बेणारा देत न हता. जे पूर्वी पालखीचे उत्पन्न होत असे ते बडवेच घेत असत. त्यावरून विचारे पाहता बेणारी यास पालखी व पालखीच्या उत्पन्नासी काय सबध आहे ? पालखी बडवी याची तेव्हा घोडे वगैरे वाहने यामुळे बडवीयाचीच खरी झाली. त्याहीमध्ये बडवीयाचा भोगवटा कारकिर्द दर कारकिर्दी (त) पहिल्यापासुन चालत आला आहे त्याबद्दल धर्मता विचारमाने पाहता, बेणारी यास पालखी व पालखीचें उत्पन्न घोडे वगैरे वाहने यासी काही अर्थाअर्थी काही सबध नाही. बडवे खरे. पालखी व पालखीचे उत्पन्न घोडे वगैरे वाहने बडवीयाचीच खरी म्हणून हजीर मजालस बोलली जे, याचा भोगवटा धर्मता पाहता बडवे खरे आहेत. यास महजर करून देणे म्हणून. त्यावरून बडवीयास महजर करून दिल्हा असे. पालखी व पालखीचे उत्पन्न घोडे वगैरे वाहने दुमाला केली असेत. बेणारी यास लेकराचे लेकरी सबध नाही. गोमजी देशमुख याचे घरी घोडे अमानत होते, ते हजीर मजालसीने आणून बडवीयाचे दुमाला केले असेत. पेशजीचे कागद पत्र बेणारी यापाशी असतील ते रद्द असेत. हा निवाडा धर्मता झाला असे लेकराचे लेकरी बडवीयानी वतन खाऊन सुखे असावे. बडवे खरे, बेणारे खोटे झाले. महजर सही.

लिहिला महजर सही.

स्वहस्त बाळकृष्ण बिन नागेशभट बेणेराय व समस्त बेणेराय
तारीख ५ माहे रबिलाखर.

गोही

| | |
|---|---|
| नरहरी गोपीनदन १. | पाडुरंग पाठक १. |
| तमणभट विध्वस १. | सामराज १. |
| आऊजी नाईक पोतदार १ | गोमाजी बोरी १. |
| रायाजी व्यकाजी १. | दाद पाठक बोबले १. |
| पुडलीक गवे १. | नारायण पाठक बोबले १. |
| नारायण सोनार १. | जिवाजी महार १. |
| तुकोजी माळी मेहतर १. | चोंडाजी सोनार १. |
| होनाप्पा तेली महेतरी १. | माणकोजी सुतार १. |
| मकाजी माळी १. | भिकाजी कोळी १. |
| रायाजी सोनार १. | भिकाजी न्हावी १. |
| निबाजी न्हावी १. | भिकाजी सुतार १. |

बापु चांभार १.
शेटी चांभार १.
विठोजी परीट १.
स्वस्त.
१ केसोजी मकर पुजारे.
१ मोरया पुजारे.
१ जिवाजी पुजारे.
१ अप्पाजी शिवदेव पुजारे.
१ डिंगर वासुदेवपंत संमत प्रमाणें.
१ वेंकु पांडुरंग परिचारक.
१ वेंकाजी रामाजी [illegible]
१ पांडुरंग हरीदास [illegible]
८

शेटी कुंभार १.
बहिरजी कुंभार १.
शिदोजी घेवारी १.
जिवाजी शिंपी १.
रायाजी सोमनाथ ताटे आसामी १.

जिवाजी विठल ताटे १.
स्वस्त विश्वनाथ पंडित पथकी आसामी १

वेंकाजी विठल दिवटे १..
त्रिंबक नरहरी दिवटे १.
हरीबा विठलदास १.
स्वस्त नारायण डांगे १.
मोरेश्वर भट थिटे १.

फेरिस्त कागद काजियाचे, बडवे व डांगे व बेणारी क्षेत्र वास्तव्य श्री पंढरपूर, येथील क्षत्रींनें श्री पाशील कागदे यांचा कजिया आहे. त्याच्या कारिना मनास आणावयाबदल त्रिवर्गाच्या तकरिरा व राजीनामे व क्षेत्रस्थ ब्राह्मण व बारामलुते यांच्या तकरिरा क्षेत्र मजकूर मुक्कामीं घेतल्या असेत. सुरुसन सच्चा आर्बैन मया व अलफ वगैरे कागद वादी निर्का वगैरे सेवधासी यांजपासून तकरिरा वगैरे कागद घेतले, इस्तकबील छ ४ जमादिलावल सामात छ. सुमार.

तपशील.

बडवे यांचे कागद सुमार.
शिवराम सखो बडवे यांचे कागद सुमार.

१ तकरीर.
१ राजीनामा.
१ यादी गोहींदारांची.
३

इस्तकबील छ ४ जमादिलावल.
छ ५ जमादिलावल.
सुमार.

गरुडध्वज समस्त बेणारी यांचे कागद सुमार.

१ तकरीर मंद २.
— तकरीर.
१ यादी.
२

डांगे नारायणभट व समस्त डांगे यांचे कागद सुमार.

१ तकरीर.
१ यादी राजीनामा.

१ जिऊला वलद खंडोबा पुजारी.
१ मल्हारभट वलद सरस्वतीभट डिंगरे.
१ भिकंभट वलद तुकदेवभट उत्पात व गोविंदभट वलद रघुनाथ.
१ नागेश वलद तोरापा परिचारक.
१ गोपाळराम व आप्पाजी हरदास.
१ निंबाजी वलद नागेशभट दिवटे.

१ लक्ष्मणाचार्य वलद रामाचार्य.
१ गोविंदभट वलद शामभट दिवटे.
१ शामभट वलद शेशभट ढोणपे आगांकु.
१ पांडुरंग बिन नारायण गोसावी ताडे.
१ दादो नरहर ताडे व बाबु वेंकाजी थिटे व त्र्यंबक सामराज आराध्ये पाटील, कुलकर्णी, जोशी व धर्माधिकारी.
१ चक्रपाणी वलद शिवाजी विठ्ठलदास व प्रल्हाद वलद गोरोजी विठ्ठलदास.
१ राणोजी वलद उदाजी कोळी पुंडलिकाचा.
१ विठू वलद रायेशेट शेटे.
३ तकरिरा जमीदार.
२ देशमुख असामी २.
१ गोपजी बिन विठोजी ताटे.
१ खंडेराव ताटे.
२
१ निराजी आवजी देशपांडे.
३
तकरीर त्रिवर्गाची मिळून एकच असे.
२ लक्ष्मण नाईक तुरळकर व बापूजी नाईक कुपी व भगवंत नाईक निवासाडेकर. एकूण तकरीर १ असामी २.
१ येसाजी बिन सिदोजी नाईक मठकरी.
२२

छ ६ जमादिलावल तकरीर सुमार ७ नारुबलुतेः—
१ केशव वलद भिकाजी सुतार.
१ निंबाजी वलद खंडोजी कुंभार व दौडाजी वलद रखमाजी कुंभार आसामी २.
८—तकरीर.

१ भिकु चांभार वलद बापोजी व गोदू कोम जनकोजी चांभार.
१ धोंडी न्हावी.
१ धोंडी महार.
१ आप्पाजी वलद सिदोजी.
१ गिरमाजी वलद वेंकाजी अनगळ पोतदार.
७
७ किंचा आगांकु आसामी.
१ विठ्ठलभट वलद अनंतभट बोरगांवकर.
१ धोंडभट वलद महादेवभट दामोदर.
१ गोपाळभट बिन रामभट तारगांवकर
१ नारायणभट बिन रामभट तुरळकर
१ पांडुरंगाचार्य वलद रामाचार्य कौलगी.
१ यमाजी यशवंत रामदास.
१ सखभट बिन कामभट गोपीचंदन.
७
१४
कतबे २.
१ तुकाजी वलद बाळाजी पुजारी.
१ भिमभट उत्पात पुजारी रुक्मिणीचा.
२

बापु चांभार १.
शेटी चांभार १.
विठोजी परीट १.
स्वस्त.
१ केसोजी मकर पुजारे.
१ मोरया पुजारे.
१ जिवाजी पुजारे.
१ अप्पाजी शिवदेव पुजारे.
१ डिंगर वासुदेवपंत संमत प्रमाणें.
१ वेंकु पांडुरंग परिचारक.
१ वेंकाजी रामाजी डिंगरे.
१ पांडुरंग हरीदास बिन गोविंद.
८

शेटी कुंभार १.
बहिरजी कुंभार १.
शिदोजी घेवारी १.
जिवाजी शिंपी १.
रायाजी सोमनाथ ताटे आसामी १.

जिवाजी विठ्ठल ताटे १.
स्वस्त विश्वनाथ पंडित पधकी आसामी १

वेंकाजी विठ्ठल दिवटे १.
त्रिंबक नरहरी दिवटे १.
हरीबा विठ्ठलदास १.
स्वस्त नारायण डांगे १.
मोरेश्वर भट थिटे १.

फेरिस्त कागद कजियाचे, बडवे व डांगे व बेणारी क्षेत्र वास्तव्य श्री पंढरपूर, येथील क्षत्रींचें श्री पाटील कायदे यांचा कजिया आहे. त्याच्या करिता मनास आणावयाबद्दल त्रिवर्गांच्या तकरिरा व राजीनामे व क्षेत्रस्थ ब्राह्मण व बारा बलुते यांच्या तकरिरा क्षेत्र मजकूर मुक्कामीं घेतल्या असेत. सुरुसन सब्बा आर्बेन मया व अलफ वगैरे कागद यादी त्रिवर्ग वगैरे क्षेत्रवासी यांजपासून तकरिरा वगैरे कागद घेतले, इस्तकबील छ ४ जमादिलावल तागाइत छ. सुमार.

तपशील.

बडवे यांचे कागद सुमार.
शिवराम सखो बडवे यांचे कागद सुमार.

१ तकरीर.
१ राजीनामा.
१ यादी मोहीदारांची.
३

इस्तकबील छ ४ जमादिलावल.
तागाइत छ ५ जमादिलावल.
तकरिरा सुमार.

गरुडध्वज समस्त बेणारी यांचे कागद सुमार.
१ तकरीर बंद २.
— तकरीर.
१ यादी.
२

डांगे नारायणभट व समस्त डांगे कागद सुमार.

१ तकरीर.
१ यादी राजीनामा.

## १६. यादी.

यादी क्षेत्र पंढरपूर येथील श्रींचें देवालयाचे किल्लीविषयीं डांगे यांचा व समस्त बडवे यांचा कजिया लागोन मनसुबी हुजूर पडली. उभयतांच्या तकारीरा व पुरशिसांचीं उत्तरें घेऊन उभयतांचे रजावंदीचे साक्षीदार पुण्यास आणून श्री नागेश्वराचे देवालयीं कलमझाड्याप्रमाणें पुरशिसा करून प्रथकाकारें सड्या लेहून घेतल्या. त्यावरून पंचाईत-मतें मनास आणितां बडवे पुरातन श्रींचे सेवाधारी साहाजण, त्यांत दिवट्याचे हिश्यांत डांग्या आलिकडे जडला. सेवाधारी यांस देवाचे सेवेचें काम सांगणें तें बडवे यांनीं सांगावें. देवास वस्त्रें अलंकार यात्रेकरू समर्पण करितील ते सर्व बडवे यांकडे. त्यांनीं संरक्षण करून श्रींस भोगवावयाचे ते भोगवीत जावें. परकड देवाजवळ येईल तें बडव्यांनीं घ्यावें. पूजा निवेदन झालीयावर सेवाधारी यांनीं यजमानास मागावें. जें देतील तें साहावाटे सातांनीं वांटून घ्यावें. दिवट्याचे साहावे हिश्यांत निमे डांग्या व निमे दिवट्या. देवाचें भांडार वेगळें नाहीं. वस्तभाव बडवे यांचे घरीं रहात असत्ये. देवालयांची एकच किल्ली ते बडव्यांपाशीं पूर्वी-पासून आहे. पांढरे याचे अमलांत सेवाधारी यांनीं उभापत्र करून किल्लीचे कजियास डांग्या उभा केला. तेव्हांपासून कजिया करितो. पूर्वी किल्लीविषयीं तुह्मांसी कधीं कजियाच नाहीं. यावरून पाहतां डांगे यास किल्लीविषयीं बडवे यांसी कजिया करावयास संबंध नाहीं. भांडण खोटें मांडलें. बडवे खरे जाहले. सबब त्यांजकडे सरकारची हरकी ७००१ रुपये.

सात हजार एक. यासी हप्तेबंदी.
२००१ तूर्त.
२००० भाद्रपद शुद्ध प्रतिपदा.
१००० आश्विन शुद्ध प्रतिपदा.
२००० कार्तिकअखेर.

७००१

एकूण सात हजार एक रुपया बडवे यांकडे सरकारची हरकी करार केली. याची निशा करून घेऊन सदरहू चार हप्त्यांनीं साल मजकुरीं वसूल घ्यावा. येणेंप्रमाणें करार करावें.

संमत

छ २१ रजब सन ईहिदे समानीन, आषाढ मास, मुकाम पुणें.

## १७. महजरनामा.

महजरनामा बतेरीख छ २२ माहे जिल्काद सुहूर सन तिसा अशरीन मया व अलफ महजुर हजीर मजालसी मुकाम किल्ले सातारा.

राजश्री मुद्गलभट पंडितराव.

मिर अनुदी देशमुख शेवगांव.
मोहर आहे.
लालमहंमद नोकर अमीरल् उमरावे.
पारशी मोहर असे.
हिरोजी सोनलकर हटकरराव, प्रांत फलटण.
राजश्री कान्होजी भोंसले सेनासाहेब सुभा.
शिक्का असे.

राजश्री निंबकराव माणकेश्वर धायगुडे.
संताजी पांढरे शरीफन मुलूक.
शिक्का.
महमंद अदल.
मोहर.
इमामशा पटेल, मौजे आळास, परगणे मिरज.
मोहर असे.

## गोत हामशाई

परगणे वांई—

राजश्री शाहूजी राजे भोंसले देशमुख, प्रांत मजकूर.
शिक्का देशमुखीचा.
चांदशेटी बिन गोपाळ शेटी शेट्या, कसबे वाई.
तागडी.
संमत निंब.
रामोजी बिन गंगाजी पाटील सावळे, मौजे शिवथर, नांगर असे.

देशमुख व देशकुळकर्णी परगणे मजकूर.
मोरो जिवाजी व गिरमाजी झुंगे देशपांडे, परगणे मजकूर.

दत्ताजी पाटील व तुळाजी पाटील, कसबे रहिमतपूर, प्रांत वाई. नांगर असे.

या वियमानें स्वस्ती श्री शके १६४० विलंबीनाम संवत्सरे, अश्विन वद्य सप्तमी, इंदुवासरे, ते दिनीं राजश्री पिलाजीराव बिन गणोजीराव व देवजीराव बिन पिलाजीराव व गुणाजीराव बिन बहिरजीराव शिर्के सरदेशमुख, मामले रायरी व देशमुख मामले दाभोळ, पश्चमवादी यासी लिहून दिल्हा महजर ऐसाजे, सातारीयाचे मुक्कामीं, राजश्री——स्वामींचे शेवेसी तुमचे भाऊ, राजश्री कान्होजीराव व बहिरजीराव व कुवरजीराव बिन रामोजीराव व दौलतराव बिन कान्होजीराव शिर्के, अग्रवादी याहीं जाहीर केलें कीं, मामले रायेरी शिरकाण येथील सरदेशमुखीचें वतन आपलें आहे. आपण पुरातन खात आहों. व मामले दाभोळ, येथील देशमुखी मन्हामती वतन आपणासच आहे. या वतनासी राजश्री पिलाजीराव व देवजीराव व गुणाजीराव शिर्के विभागासाठीं आपणासीं भांडतात. तरी साहेबीं, त्यांची व आपली धर्मता मनसुबी गोतमुखें करून विल्हे लावली पाहिजे, ह्मणोन जाहीर केलें. त्याजवरून, महाराजसाहेबीं तुम्हांस व त्यांस रुबरू हुजूर बोलावून, करिना विचारून, गोतमुखें निवाडा होईल त्याप्रमाणें वर्तावें ये बाबे जमान मातबर देणें ह्मणून आज्ञा केली. मग तुम्हीं व त्यांनीं राजी होऊन, येणेंप्रमाणें जमान दिल्हे तपशील:—

अग्रवादी कान्होजीराव व बहिरजीराव व कुवरजीराव बिन रामोजीराव व दौलतराव बिन कान्होजीराव शिर्के यासी जमान, राजश्री फत्तेसिंग भोसले, बरहुकूम जमान कदवा.

पश्चमवादी पिलाजीराव व देवजीराव व गुणाजीराव शिर्के यासी जमान, काळोजी भोसले मुकादम, कसबे फलटण, बरहुकूम जमान कदवा.

येणेप्रमाणे हरदूजणानी जमान दिल्हे. मग पचाईत गोतवारी शपथ गोहत्या व ब्राह्मणहत्या श्रीवाराणशीत केली याची शपथ राजश्री साहेबी घातली की, उभयताची मनसुबी धर्मता करणे. त्यावरी गोतसभा बैसोन हरदूजणास तकारिरा लिहून देणे ह्मणोन गोतनाईकानी आज्ञा केली. त्यावरोन येणेप्रमाणे उभयतानी तकारिरा लिहून दिल्हा बितपशील:—

बेशमी कान्होजीराव व बहिरजीराव व कुवरजीराव बिन रामोजीराव व दौलतराव बिन कान्होजीराव शिर्के अग्रवादी यानी तकरीर केली ऐसीजे, आपले कदीम वतन सरदेशमुखीचे, मामले रायेरी शिरकाण येथील आहे. त्यास वडिलानी दलपतराव पाताणे प्रभू मुतालिकीस ठेविला होता तो, कितीका दिवसानी बळाऊन, आपण वतनदारच ह्मणवून बळेच वतन खाऊं लागला. त्यास आपण वाद सांगोन टक्का खर्च पडला, तो पदरिचा देऊन, आपलें वतन सही करून प्रभूस दूर करून, आपण वतन खात आहों. राजश्री राजारामसाहेबी, चंदीचे मुक्कामी सरदेशमुखीचे वतन आपणासच खरे करून दिल्हे. त्यास तीस पस्तीस वर्षे जाहली. वतन आपण अनभवीत आहो. राजश्री गणोजीराव शिर्के आपले भाऊ खरे; परंतु त्याचा भोगवटा या वतनास नाही. व दाभोळचे देशमुखीचें वतन राजश्री राजारामसाहेबी चंदीहून स्वार जाहले, ते समयी राजश्री रामोजीराव शिर्के, आपले वडीलभाऊ व राजश्री गणोजीराव शिर्के यासी नूतन महामत केले. त्या वतनाचाही भोगवटा आपणच करीत आहो त्यास दखलगिरी वतनात दिल्ही नाही. या वतनास हक्क दरसदे एकोत्रा होता. तो आपणच खात आहों. त्यावर मातुश्री ताराबाईसाहेबाचे वेळेस, राजश्री परशराम पंडित यानी चिपळूण घेतले, ते समयी कष्ट, मेहनत आपण व रामोजीराव शिर्के यानी बहुत केली, ह्मणून हक्क दरसदे नूतन रुपये ४ चार व कदीम रुपया १एक होता, तो देखील पंचोत्रा हक्क करार करवून दिल्हा. ती सनद रामोजीराव शिर्के याचे नावे महामत केली. पहिली सनद एकोत्र्याची उभयताचें नावें आहे. ही दोन्ही वतने आपली, हे खरे करून गोही साक्षीनें देऊ. यासी अन्यथा झाले तरी गोताचे अन्यायी व दिवाणचे गुन्हेगार, ही तकरीर सही

बेशमी पिलाजीराव बिन गणोजीराव व देवजीराव बिन पिलाजीराव व गुणाजीराव बिन बहिरजीराव शिर्के, पश्चमवादी यानी केली, तकरीर ऐसीजे:—मामले रायेरी शिरकाण, येथील सरदेशमुखीचे वतन, आपले कदीम आहे. यासी रामोजीराव व दोलतराव शिर्के वडील ह्मणवितात. तरी आह्मा उभयतासही, वडील आपणही आहेत. आपले उभय-

ताची हकिकत, तरी दौलतराव याचे आजे तानाजीराव शिर्के वडील भाऊ, आपले बाप पिलाजी शिर्के धाकटे भाऊ. त्यास दौलतराव याचे वडिली वतनाची मेहनत केली. परंतु आपले भाऊ गणोजी शिर्के त्याची भीड राज्यात दरबारी होती. त्याच्या नावावर यानी मेहनत केली, हे खरें. सारे शिरकाणचे वतन सरदेशमुखीपैकी निमे आपले आहे व निमे दौलतराव याचें आहे व दाभोळचे देशमुखीचे वतन, राजश्री राजारामसाहेबी चदीहून बाहेर निघता, गणोजीराव शिर्के यानी, राजश्री—बरोबर मेहनत करून, येलुरास राजश्रींस पोहोंचविले. मग राजश्री—कृपाळू होऊन, गणोजीराव शिर्के यास वतन मऱ्हामत दाभोळचे देशमुखी केली ती सनद गणोजीराव शिर्के याही दौलतराव यापाशी व रामोजीराव याजपाशी दिल्ही आहे. तीच सनद वजिनस त्यानी आणून दाखवावी. दुसरीयाने सनद करून रामोजीराव शिर्के यानी घेतली. ते आपले नाव आधी घालून, मग गणोजीराव शिर्के याचे नाव लिहून सनद घेतली ती सनद एकाचे हातें केली ती प्रसगानुसार हाजीर दाखवून देऊन, ते सागतील त्यावरून कळेल. व चदीमध्ये राजश्री राजारामसाहेबी आपणासच सुद्ध देशमुखीचे वतन मऱ्हामत केले तेव्हा मजालसीस येणेप्रमाणे होते. हल्ली ते मजालसीस येथे आहेत वितपशीलः—

| | |
|---|---|
| राजश्री शकराजी मल्हार १. | राजश्री आबुराव १. |
| राजश्री मानसिग मोरे १. | राजश्री खडेराव दाभाडे १. |
| राजश्री खडो बल्लाळ १. | राजश्री कृष्णाजीराव मोरे व प्रतापराव मोरे. |

येणेप्रमाणे आहेत. त्यास हकिकत दखल आहे. हे सत्य स्मरून सागतील. त्यास आपण मान्य असों. दाभोळचे सारे वतन देशमुखीचे आपले आहे. यासी अन्यथा जाहली-याने आपण गोताचे अन्यायी व दिवाणचे गुन्हेगार, ही तकरीर सही.

येणेप्रमाणें हरदूजणाच्या तकरिरा घेऊन, सभासदानी तकरिराचे अर्थ पाहता, हे दोन्हीं वतनाचे भाडण दोघास लागले. दोघाचे मूळपुरुष एकच आहेत. परंतु कदीम वतन शिरकाण मामले रायेरी, तेथील मेहनत दौलतराव शिर्के अग्रवादी यानी आपलेच आहे व दाभोळचाही आपणच मोगवटा सपादला, ह्मणवून तकरीर केली. व पश्चमवादी पिलाजीराव शिर्के व देवजीराव शिर्के व गुणाजीराव शिर्के यानी तकरीर केली की, दाभोळचें वतन अजरामऱ्हामत आपलें सारे आहे व शिरकाण मामले रायेरी, त्या वतनाची मेहनत दौलतरावाचे वडिली केली.परंतु आपले बधु गणोजीराव शिर्के त्याची भीड राज्यात दरबारीं होती. त्याच्या नावावरी अवघे वतनाचें साहित्य जाहले. कदीम वतनात आपले निमे वतन रायरी मामलीयाचें ह्मणवून तकरीर केली. दोघाच्या तकरिरा बरवे रीतीनें मजालसीस पसत करून मग राजश्री—स्वामीनी मनास आणून चदीचे मुक्कामी, राजश्री—राजारामसाहेबी दाभोळचे देशमुखीचे वतन मऱ्हामत करिता, कोणासी केले ते प्रसगीं येणेप्रमाणे होतें. त्यासीं शपथ श्रीवाराणशीत गोहत्या, ब्रह्महत्येचे पातक ऐसी शपथ घालून सत्य सागणे ह्मणवून. येणेप्रमाणे यासी विचारिले. त्यानी साक्ष दिल्ही वितपशीलः—

राजश्री शकराजी मल्हार १. राजश्री आनुराव १. राजश्री मानसिंग मोरे १.
राजश्री खंडेराव दाभाडे १ राजश्री खंडो बल्लाळ राजश्री कृष्णाजी मोरे व प्रतापराव १.
चिटणीस १.

यानीं साक्ष सांगतां, राजश्री खंडो बल्लाळ उभे राहून, राजश्री स्वामीचे शेवेसी विनंति केली कीं, शिर्के ह्यांची साक्ष देतां भय वाटे ते आपणादेखतच चंदीमध्ये जें जाहले, ते सत्य सांगतां कोणासी कैसें वाटेल. येविषयी आपल्या जीवाचे धणी कोण आहे ? ऐसें बोलिल्यावरी राजश्री—स्वामींनी त्यासी आज्ञा केली कीं, तुमच्या जिवाचे धनी आपण आहो. ऐसें अभय राजश्री—चें जाहलें. मग खंडो बल्लाळ यानीं साक्ष दिल्ही कीं, दाभोळचे वतन देशमुखीचे पूर्वी राजश्री राजारामसाहेबीं आपणास दिल्हें होतें. मग चंदीचे मुक्कामीं ताम्रानीं चंदी सिकंदा जाहली. राजश्री स्वामीस कुटुंबासहवर्तमान बाहीर निघावें सारिखा प्रसंग जाहला. ताम्राचे मोर्चे चहूंकडे ते वेळेस राजश्री गणोजीराव शिर्के ताम्राकडे होते. त्यानीं त्या सकटीं एकनिष्ठता धरून, श्रम सायास करून, राजश्री—चंदींतून बाहेर काढून, वेलुरास नेऊन पोहचविले राजश्री—ची कृपा संपादून घेऊन, दाभोळचे देशमुखीचें वतन आपणास देणें म्हणवून, अर्ज करून मागितलें त्याजवरी स्वामी कृपाळू होऊन, वतन त्यास द्यावें ऐसें मनात आणून, आपणास राजश्रीनीं आज्ञा केली तुम्हास दुसरें वतन देऊन, तुमचे उर्जित करूं हे वतन सोडून देणें, म्हणोन आज्ञा केली. मग आपण अर्ज केला कीं, आपलें वतन साहेबाचे पाय आहेत. ऐसा अर्ज करून, वतनाच्या सनदा आपल्या नावाच्या होत्या त्या, राजश्रीपुढें ठेविल्या. त्या सनदा राजश्रीनीं दूर करून, राजश्री गणोजीराव शिर्के यास देशमुखी अजरामऱ्हामत करून, दुमाला सनदा त्याच्या नांवें करून दिल्हा म्हणवून खंडो बल्लाळ यानीं साक्ष दिल्ही मग राजश्री शकराजी मल्हार व अवघे यासी पृथकाकारें सदरहू वचनासी पुसिलें. त्यानीं सांगितलें कीं, जे खंडोबानी साक्ष दिल्ही, ते यथार्थ आहे आपणासही याप्रमाणें ठाऊक आहे, म्हणवून साक्ष दिल्ही याउपरी मनास आणिता, सभासदाच्या मतें विचार जाहला कीं, मामले रायेरी येथील सरदेशमुखीचें वतन, कदीम याच्या वडिलाचें होतें. ते प्रभु पातोणा मुतालिक ठेविला होता तो बळावला त्यासी दौलतरावाचे भावानीं वाद सांगोन सोडविलें. परंतु ती वडिलाची भाकरी एकानेच खावी, भावास विभाग न द्यावा, असें उचित नव्हे. दाभोळचें वतन देशमुखीचें मऱ्हामत गणोजी शिर्के यासच झालें, ते त्यानीं खावें. तेथें भावास विभाग न द्यावा, हे विहित नव्हे. वतनाची पुरसवानी करून, दाभोळेस भोगवटा दौलतराव शिर्के याच्या भावानीं केला आहे. याउपरी दोन्ही वतनें, दोघा भावास वाटून द्यावीं. समजाविशीं करून दोघाचा कुसूर तोडावा. ऐसें समस्त गोतसभासदाचे मजालसीचे मनास आलें. त्याप्रमाणें हरदूजणा भावास विचारिलें. मग हरदूजणानीं राजी होऊन सांगितलें कीं, समस्त गोतगंगा वडील आहा. आम्हास तुटी दिल्हेस लावाल त्याजप्रमाणें आपण वर्तणूक करूं. राजी

होऊं. म्हणवून राजी होऊन, दोघांनीं मज्यालसीस गोताजवळ सांगितलें. मग येणेंप्रमाणें दोघांस दोन्हीं वतनाची वांटणी करून गोतानें दिल्ही. बितपशील.

मामले रायेरी शिरकाण, येथील सरदेशमुखी कदीम वतन आहे. तेथील वतनाचें उत्पन्न दोघांनीं बरोबरी निम्यानिम वाटोन खावें. येथील वडीलपण शिक्का व मानपान, तश्रीफ आधीं कान्होजीराव बिन रामोजीराव शिर्के यांनीं घ्यावें. त्याचे मागें मानपान, तश्रीफ पिलाजीराव बिन गणोजीराव शिर्के यानीं घ्यावी. वडीलपण येथील कान्होजीराव यासी दिल्हें. धाकटेंपण पिलाजीराव बिन गणोजीराव शिर्के यासी करार करून दिल्हें असे. येणेंप्रमाणें तह केला असे. याप्रमाणें येथील वतन दोघांनीं खाऊन, समानुगतीनें असावें. नव-दिगर परस्पर करावयासी गरज नाहीं.

मामले दाभोळ येथील देशमुखी वतन अजरा मह्रामत गणोजीराव शिर्के यांचे नांवें आहे. या वतनाचें वडीलपण शिक्का, मानपान, तश्रीफ आधीं पिलाजीराव बिन गणोजीराव शिर्के यानीं घ्यावें. येथील वडीलपणा यास करार करून दिल्हा असे. याचे मागें कान्होजीराव बिन रामोजीराव शिर्के याणी मानपान, तश्रीफ, घ्यावी. धाकुटपणें याणीं असावें. याजखेरीज वतनाचें उत्पन्न दोघांनीं दोन्हीं ठायीं बरोबर वांटून, निम्यानिम खाऊन असावें. येणेंप्रमाणें तह करून, दोघांचा कुसूर तोडिला असे. याप्रमाणें वतन दोघांनीं खाऊन, समानुगतीनें परस्परें असावें. नवदिगर करावयासी गरज नाहीं.

सदरीलप्रमाणें दोघांची समजाविस करून, दोन्हीं वतनें दोघांस सदरीलप्रमाणें दिल्हीं असेत. वडीलपणें ही दोन्हीं वतनाचीं दोघांस सदरील लिहिलेंप्रमाणें दिल्हीं. वरकड उत्पन्न दो वाटाचे दो ठायीं दोघांनीं निम्यानिम खाऊन, समाधानरूप असावें. या निवाडीयास परस्परें हिल्ला हरकत करील तो खोटा; गोताचा अन्यायी; दिवाणचा गुन्हेगार; त्यासी वतनासी संबंध नाहीं. सदरीलप्रमाणें वतनाचे विभाग करून, तुह्मांस महजर करून दिल्हा असे. याप्रमाणें तुह्मीं आपला विभाग दोन्हीं वतनाचा खाऊन, वंशपरंपरेनें सुखरूप असावें हा महजर.

सही लेखन अलंकार मोर्तब असे.

राजे शिर्के याजकडे व निमे विभाग आम्हाकडे, याप्रमाणे निवाडा होऊन, सन इहिदे समानीनचे साली आम्हास निवाडपत्रे यावयाची यादी करार झाली. त्याप्रमाणे आम्ही सरकारची पत्रे तयार केली. कराराप्रमाणे सरकारचे नजरेचा ऐवज देणे, त्याचे भरण्याची तरतूद करून, पत्रावर शिक्के करून घ्यावे, तो इयज बोरघाटावरी आला. पुण्यात गडबड झाली, त्यामुळे देशीं ऐवजाची तरतूद न होय, सबब निवाड्याची यादी झाली, ती आम्ही घेऊन, ऐवजाचे सोईकरिता नागपुरास गेलो. ही सधी पाहून, लक्ष्मणराव शिर्के यानी सरकारात आठ हजार रुपये नजर कबूल करून, विनंति केली जे, पेशजी कैलासवासी शाहूमहाराज याचे वेळेस, आपले पिते कान्होजी शिर्के यानी, सदरहू दोन्ही वतनाचें वडीलपण शिक्का आपला आणून श्री कृष्णेचे दिव्य करून, दिव्यास पार पडले देवजी शिर्के यासी वतनासी सबंध नाही याप्रमाणे होऊन राजपत्रे झाली होती ती गळाउली. परंतु तुळाजी आंग्रे सरखेल यासी, दाभोळचे देशमुखीविषयी हातरोखा दिल्हा. त्यात दिव्याचा दाखला लिहिला आहे, व सातारीयाचे दप्तरी राजपत्रे बार असतील, ती लिहून आणून शोध करावा याप्रमाणें आपण म्हणत असता, ध्यानास आणिता दिव्याचे पूर्वील राजपत्राचे अन्वये भिकाजीराजे शिर्के यासी निवाडीयाची यादी करून दिल्ही आहे. ते आणवून पुर्ती चौकशी करावी. याप्रमाणे निवेदन करून, नजरेचा ऐवज सरकारात देऊन, सदरहू ऐवज व्याज सुद्धा फिटे तोंपर्यंत दरोबस्त वतन आपणाकडे चालावे. दरम्यान भिकाजीराजे शिर्के यानी कजिया करू नये ऐसा करार करून घेऊन, सदरहू अन्वयें पत्रे घ्यावयाची यादी करून घेऊन, त्याप्रमाणे पत्रे तयार करविली. त्याजवर शिक्के व्हावे तों तेच साली पौष मासी, आपण नजरेचे ऐवजानिशी हाजर होऊन विनंति केली त्याजवरून त्याचे पत्रावर शिक्के व्हावयाचे राहिले त्यास साहेबी कृपाळू होऊन, तिगस्ताचे कराराप्रमाणे हरफीचा ऐवज घेऊन, इनसाफ होऊन, निवाडपत्रे तयार झाली आहेत त्याजवर शिक्के करून देऊन, निमें वतन आमचे आम्हाकडे चालतें करावे म्हणून. व लक्ष्मणराव शिर्के याचे बोलणे की, कैलासवासी शाहूमहाराजाचे वेळेस कान्होजी शिर्के यानी सदरहू दोन्ही वतनाचे वडीलपण शिक्का आपला म्हणून, श्रीकृष्णेचें दिव्य करून, राजपत्रें करून घेतली होती ती गळाउली. यास्तव सातारीयाचे दप्तरचे बार लिहून आणवून, भिकाजीराव शिर्के याचे नावे साल तिगस्ता निवाडीयाची यादी करून दिल्ही आहे, त्याची गुदस्ता आज्ञापासून आठ हजार रुपये नजर घेऊन, पुर्ती चौकशी करणेविषयी आम्हास पत्रे दिल्ही आहेत. त्याप्रमाणे हल्ली पुरती चौकशी करावी म्हणून आक्षेप केला. त्याजवरून कृष्णराव अनंत, किल्ले सातारा, यासी पत्रे पाठविली. त्यानी तेथील मजमू दप्तरी शोध करून, दाहा पत्रे बार झालीयाची यादी पाठविली त्यातील अन्वये स्वामी यानी राजश्री कान्होजीराजे व कुवरजी व जयसिंग व नाहिरजी व बापोजी व उदतसिंग व बाजी बिन रामोजी राजे शिर्के यासी दिल्हे वतनपत्र ऐवेजे, शाहूनगर नजिक किल्ले

होऊं. म्हणवून राजी होऊन, दोघांनीं मल्यालसीस गोताजवळ सांगितलें. मग येणेंप्रमाणें दोघांस दोन्हीं वतनाची वांटणी करून गोतानें दिल्ही. तपशील.

मामले रायेरी शिरकाण, येथील सरदेशमुखी कदीम वतन आहे. तेथील वतनाचें उत्पन्न दोघांनीं बरोबरी निम्यानिम वाटोन खावें. येथील वडीलपण शिक्का व मानपान, तश्रीफ आधीं कान्होजीराव बिन रामोजीराव शिर्के यांनीं घ्यावें. त्याचे मागें मानपान, तश्रीफ पिलाजीराव बिन गणोजीराव शिर्के यानीं घ्यावी. वडीलपण येथील कान्होजीराव यासी दिल्हें. धाकटेंपण पिलाजीराव बिन गणोजीराव शिर्के यासी करार करून दिल्हें असे. येणेंप्रमाणें तह केला असे. याप्रमाणें येथील वतन दोघांनीं खाऊन, समानुगतीनें असावें. नवदिगर परस्पर करावयासी गरज नाहीं.

मामले दाभोळ येथील देशमुखी वतन अजरा मऱ्हामत गणोजीराव शिर्के यांचे नांवें आहे. या वतनाचें वडीलपण शिक्का, मानपान, तश्रीफा आधीं पिलाजीराव बिन गणोजीराव शिर्के यानीं घ्यावें. येथील वडीलपणा यास करार करून दिल्हा असे. याचे मागें कान्होजीराव बिन रामोजीराव शिर्के याणीं मानपान, तश्रीफ, घ्यावी. धाकुटपणें याणीं असावें. याजखेरीज वतनाचें उत्पन्न दोघांनीं दोन्हीं ठायीं बरोबर वांटून, निम्यानिम खाऊन असावें. येणेंप्रमाणें तह करून, दोघांचा कुसूर तोडिला असे. याप्रमाणें वतन दोघांनीं खाऊन, समानुगतीनें परस्परें असावें. नवदिगर करावयासी गरज नाहीं.

सदरीलप्रमाणें दोघांची समजाविस करून, दोन्हीं वतनें दोघांस सदरीलप्रमाणें दिल्हीं असेत. वडीलपणें ही दोन्हीं वतनाची दोघांस सदरील लिहिलेप्रमाणें दिल्हीं. वरकड उत्पन्न दो वाटाचे दो ठायीं दोघांनीं निम्यानिम खाऊन, समाधानरूप असावें. या निवाडीयास परस्परें हिल्ला हरकत करील तो खोटा; गोताचा अन्यायी; दिवाणचा गुन्हेगार; त्यासी वतनासीं संबंध नाहीं. सदरीलप्रमाणें वतनाचे विभाग करून, तुम्हांस महजर करून दिल्हा असे. याप्रमाणें तुम्हीं आपला विभाग दोन्हीं वतनाचा खाऊन, वंशपरंपरेनें सुखरूप असावें हा महजर. सही लेखन अलंकार मोर्तब असे.

## १८. निवाडपत्र.

यादी भिकाजीराव बिन देवजीराजे शिर्के सरदेशमुख, मामले रायरी, याचे नांवें पत्र कीं, तुम्हीं हुजूर कसबे पुणें येथील मुकामीं येऊन, विदित केलें कीं, मामले रायरी शिरकाण येथील सरदेशमुखी व सुभा दाभोळ, येथील देशमुखी या दोन्हीं वतनाचे विभागाविषयीं, लक्ष्मणराव बिन कन्होजी राजे शिर्के यांचा व आमचा कजिया लागोन साल तिगस्ता मनसुबी हुजूर पडली. ते समयीं उभयतांनी आपलालें वर्तमान लिहून देऊन, साधकाचे कागदपत्र आणून दाखविले. त्यावरून हुजूर पंचाईतमतें मनास आणितां, मामले रायरी शिरकाण, येथील सरदेशमुखीचें वतन पुरातन वडिलांचें आहे. तेथील हक्क रुसुम व इसाफत गांव व इनाम जमिनी वगैरे सुदामत चालत असेल, त्याचा निमे विभाग वडीलपण लक्ष्मण

राजे शिर्के याजकडे व निमे विभाग आह्माकडे, याप्रमाणे निवाडा होऊन, सन इहिदे समानीनचे साली आम्हास निवाडपत्रे द्यावयाची यादी करार झाली. त्याप्रमाणे आम्ही सरकारची पत्रे तयार केली कराराप्रमाणे सरकारचे नजरेचा ऐवज देणे, त्याचे भरण्याची तरतूद करून, पत्रावर शिक्के करून घ्यावे, तो इग्रज बोरघाटावरी आला. पुण्यात गडबड झाली, त्यामुळे देशीं ऐवजाची तरतूद न होय, सबब निवाड्याची यादी झाली, ती आम्हीं घेऊन, ऐवजाचे सोईकरिता नागपूरास गेलो हीं सर्व पाहून, लक्ष्मणराव शिर्के यानी सरकारात आठ हजार रुपये नजर कबूल करून, विनंति केली जे, पेशजी कैलासवासी शाहूमहाराज याचे वेळेस, आपले पिते कान्होजी शिर्के यानी, सदरहू दोन्ही वतनाचे वडीलपण शिक्का आपला आणून श्री कृष्णेचे दिव्य करून, दिव्यास पार पटले देवजी शिर्के यासी वतनासी सबंध नाही याप्रमाणे होऊन राजपत्रे झाली होती ती गळाठली. परंतु तुळाजी आंगरे सरखेल यासी, दाभोळचे देशमुखीविषयी हातरोखा दिल्हा. त्यात दिव्याचा दाखला लिहिला आहे, व सातारीयाचे दफ्तरी राजपत्रे बार असतील, ती लिहून आणून शोध करावा याप्रमाणे आपण म्हणत असता, ध्यानास आणिता दिव्याचे पूर्वील राजपत्राचे अन्वये भिकाजीराजे शिर्के यासी निवाडीयाची यादी करून दिल्ही आहे ते आणवून पुर्ती चौकशी करावी. याप्रमाणे निवेदन करून, नजरेचा ऐवज सरकारात देऊन, सदरहू ऐवज व्याज सुद्धा फिटे तोंपर्यंत दरोबस्त वतन आपणाकडे चालावे दरम्यान भिकाजीराजे शिर्के यानी कजिया करू नये ऐसा करार करून घेऊन, सदरहू अन्वये पत्रे द्यावयाची यादी करून घेऊन, त्याप्रमाणे पत्रे तयार करविली त्याजवर शिक्के व्हावे तो तेच साली पौष मासी, आपण नजरेचे ऐवजानिशी हाजर होऊन विनंति केली त्याजवरून त्याचे पत्रावर शिक्के व्हावयाचे राहिले त्यास साहेबी कृपाळू होऊन, तिगस्ताचे कराराप्रमाणे हरकीचा ऐवज घेऊन, इनसाफ होऊन, निवाडपत्रें तयार झाली आहेत त्याजवर शिक्के करून देऊन, निमे वतन आमचे आम्हाकडे चालवें करावे ह्मणून व लक्ष्मणराव शिर्के याचे बोलणे की, कैलासवासी शाहूमहाराजाचे वेळेस कान्होजी शिर्के यानी सदरहू दोन्ही वतनाचे वडीलपण शिक्का आपला ह्मणून, श्रीकृष्णेचें दिव्य करून, राजपत्रे करून घेतली होती ती गळाठली यास्तव सातारीयाचे दफ्तरचे बार लिहून आणवून, भिकाजीराव शिर्के याचे नावे साल तिगस्ता निवाडीयाची यादी करून दिल्ही आहे, त्याची गुदस्ता आह्मापासून आठ हजार रुपये नजर घेऊन, पुर्ती चौकशी करणेविषयी आह्मास पत्रे दिल्हीं आहेत त्याप्रमाणे हल्ली पुरती चौकशी करावी ह्मणून आक्षेप केला त्याजवरून कृष्णराव अनंत, किल्ले सातारा, यासी पत्रे पाठविली. त्यानी तेथील मजमू दफ्तरी शोध करून, दाहा पंधरे बार झालीयाची यादी पाठविली त्यातील अन्वये स्वामी यानी राजश्री कान्होजीराजे व कुवरजी व जयसिंग व नाहिरजी व बाघोजी व उदतसिंग व बाजी बिन रामोजी राजे शिर्के यासी दिल्हे वतनपत्र ऐसेंजे, शाहूनगर नजीक किल्ले

सातारा, येथील मुक्कामीं विनंति केली कीं, मामले रायरी शिरकाण येथील सरदेशमुखी व सुभा दाभोळ, येथील देशमुखी हीं दोन्हीं वतनें पुरातन आपल्या वडिलांचीं होतीं. तीं कालगतीनें कित्येक दिवस चालत नव्हतीं. त्याउपरी महाराज राजारामसाहेब यांसमागमें रामोजी राजे शिर्के चंदीस जाऊन, कष्ट मेहनत करून, सेवा केली. त्याजवरून महाराजांनीं सदरहू दोन्हीं वतनें, आपले बाप रामोजी शिर्के यांसी अजरामऱ्हामत करून, वतनपत्रें दिलीं. त्याप्रमाणें अनभवीत असतां, देवजीराव शिर्के, आमचे चुलते विठोजी व दौलतराव शिर्के या तिघांचा कजिया वतनसंबंधें लागोन, वतनाचे विभाग करून द्यावे म्हणून विनंती केल्यावरून महाराजांनीं हरदू वतनपैकीं निमें वतन व दाभोळ सुभ्याचें देशमुखीचें वडीलपण देवजीराव शिर्के यांसी देऊन, वतनपत्रें करून दिल्हीं. आम्हीं मबुद्ध झालीयावर, त्यांजकडे वडीलपण शिक्का चालों दिल्हा नाहीं. सरदेशमुखीचें वतन पुरातन वडिलांचें खरें, परंतु पालाणें परभू मुतालीक अनभवीत होता. त्यासी वाद सांगोन कष्ट मेहनत व दक्का पैका वेंचून वतन करून घेतलें असतां, देवजीराव व विठोजीराव व दौलतराव शिर्के यांसी वतन विभागून द्यावयासी संबंध नाहीं. जें देणें तें वडीलपणें आपण देऊं. महाराजांनीं पत्रें करून दिल्हीं, त्या आश्रयानें देवजी शिर्के आम्हांसीं कजिया करितात. त्याचा आमचा करिना मनास आणून निवाडा केला पाहिजे म्हणून विनंति केली. त्यावरून त्याचा व तुमचा करिना मनास आणून, निवाडा करावयासी पंचाईत नेमून दिल्ही तपशीलः—

आप्पाजी बिन विठोजी माने, पाटील, कसबे रहिमतपूर, संमत कोरेगांव, प्रांत वाई १.
काळोजी पाटील, मौजे पळसदेव, परगणे इंदापूर १.
पटलोजी पाटील, मौजे वाथेरी, प्रांत कऱ्हाड १.
रावजी जगताप, कसबे सासवड १.
(नांव लागलें नाहीं.) पाटील, मौजे माणकेश्वर, परगणे भूम १.

येणेंप्रमाणें पांचजण वतनदार हुजूर आणून, निवाडा करावयाविषयीं आज्ञा केली. त्यांनीं मनास आणिता, दोन्हीं वतनांचें वडीलपण शिक्के रामोजी शिर्के यांचे, असे पंचाईतमतें होतांना देवजीराव शिर्के बोलिले कीं, दोन्हीं वतनाचें वडीलपण शिक्का आपला. याप्रमाणें कान्होजी शिर्के यांनीं श्री कृष्णावेणी संगमीं उभे राहून, आमचे हातावर पाणी घालून, दशरात्र पार पडल्यास निमें वतनासी व दाभोळ सुभ्याचे देशमुखीचे वडीलपण शिक्क्यासी आपणास संबंध नाहीं. त्यावरून तुम्हीं शके १६६५ रुधिरोद्गारीनाम संवत्सरें, श्री कृष्णावेणी संगमीं उदकांत उभे राहून उच्चार केला जे, दोन्हीं वतनें पुरातन वडिलांचीं होतीं, तीं कालगतीनें बहुत दिवस जाऊन भोगवटा तुटला होता. त्यास आमचे बाप रामोजी शिर्के यांनीं स्वामीसेवा एकनिष्ठेनें करून, कष्ट मेहनत व दक्का पैका वेंचून दोन्हीं वतनें साधलीं. वडीलपण शिक्का आमचा ऐसा उच्चार करून, देवजीराव शिर्के यांच्या हातावरी तुम्हीं पाणी घातलें. नेमास पार पडलेत. त्याजवरून दोन्हीं वतनें तुम्हांस दरोबस्त देऊन, हें वतनपत्र

करून दिल्हे असे देवजी शिर्के यासी निमे वतनासी व दाभोळ मामल्याचे देशमुखीचे वडीलपणासी संबध नाही म्हणून व सदरहू दोन्ही वतनासी विठोजी व दौलतराव व कान्होजी व बहिरोजी शिर्के यांसी संबंध नाही, ऐसी राजपत्रे तुम्हाजवळ आहेत त्या तीस(?) अन्वये मामले दाभोळ, येथील देशमुखीचे वतनाविषयी राज्याभिषेक शके ४४ चे सालचे राजपत्र, राजा शाहू छत्रपति स्वामी यांनी, पिलाजीराव बिन गणोजीराव व देवजीराव बिन पिलाजीराव देशमुख मामले दाभोळ यांसी दिल्हे वतनपत्र ऐसेजे, तुमचे चुलते देवजी शिर्के स्वामीसंनिध किल्ले सातारीयाचे मुक्कामी येऊन विदित केले की, मामले दाभोळ येथील देशमुखीवतन पूर्वी ब्राम्हणाचे, त्यास त्या ब्राम्हणापासून इदलशाहा पातशहासी हरामखोरी झालीयाबद्दल त्यास मुसलमान केले आणि देशमुखीचें वतन कित्येक वर्षे अमानत असता, शृंगारपुरी सुर्याजी राजे सुर्वे यानी पिलाजीराव शिर्के यांसी आपली लेक दिल्ही त्यानीं पातशहास विजापुरी अर्ज पोचविला त्यावरून पिलाजीराव यास दाभोळ मामल्याचे देशमुखीचे वतन महामत केले त्याचा भोगवटा व्हावा तो छत्रपति थोरले स्वामीस तळकोकण काबीज झाले यास्तव न जाहला. त्याउपरी काही वर्षे थोरले शिवाजीमहाराज यांनीं आपली लेक राजकुवरबाई गणोजीराव यांसी दिल्ही व पिलाजीराव शिर्के याची लेक जिऊबाई संभाजीराजास केली याउपरी कोकणात लखम सावंत फिसाहत करून, बखेडा होऊ न देई याजकरिता महाराजानीं पिलाजीरायास सावताकडे पाठवेल त्यानीं सावंतास आणून, राजास भेटवून तह करून दिल्हा ते समयी महाराज कृपाळू होऊन, उचित करावयावरी आले ते समयी चिरंजीव राजकुवरबाईस पुत्र होईल, त्यास मामले दाभोळ येथील देशमुखीचे वतनाचा भोगवटा चालत नाही ते वतन करून देऊ त्याजवर राजश्री राजारामसाहेब तावाचे दाटीचे प्रसंगे कर्नाटकात चंदी प्रते गेले तिकडे ताब्याच्या फौज झुलफुकारखान जाऊन चंदीस वेढा घातला ते समयी गणोजीराव मोगलाचे चाकर असता' त्यानीं स्वामीस व सौभाग्यवती ताराबाई व राजसबाई व राजकुंवरसहित चंदीहून काढून रात्रीचीं अरणीस पावविलीं त्या सेवेमुळे राजश्री राजाराम संतोषी होऊन काय पाहिजे ते मागा ऐसी आज्ञा केली तेव्हा गणोजीराव यांनी विज्ञापि केली जे, दाभोळचे देशमुखी इदलशाहानी अमानत केली होती ते त्यानीं आपले बाप पिलाजीराव यांसी दिल्ही, परंतु भोगवटा न जाहला त्या वतनावर कोणी वतनदार नव्हता म्हणून चंदीचे मुक्कामी राजश्री खडो बल्लाळ चिटणिवीस यास दिल्ही आहे- ऐसीयासी आपणास आपण देऊ, ऐसें अभय पूर्वील आहे त्याजप्रमाणे आपणास पुत्र झाला आहे त्याचे नाव पिलाजीराव ठेविले असे तरी ते वतन आपणास द्यावे त्यावरून राजश्री खंडो बल्लाळ याचे समाधान करून, त्यास दुसरे वतन देऊ केले आणि दाभोळचे देशमुखीचे वतन गणोजी राजे यांसी देऊन, पत्रे करून दिल्हा व खडो बल्लाळ यास पत्रें दिल्ही होती, ती घेऊन गणोजीराव याजपाशी दिलीं येलुराहून स्वामी स्वार होऊन, स्वराज्यात स्वदेशी आले

त्यांजसमागमें रामोजी बिन कान्होजी शिर्के, गणोजीरावाचे पुतणे देशीं आले. त्यांजपाशीं वतनाचीं पत्रें देऊन इकडे पाठविलें. देशीं आलीयावर वतन चालवण्याबद्दल ताकीद पत्रें मागितलीं तीं, राजश्री स्वामींनीं देवविलीं. त्या पत्रांत आपलें नांव घालून, राजपत्रें घेतलीं आणि वतनाची कमाविस करूं लागले. आपणास वतनास दखल होऊं देत नाहीं. यामुळें याचा आमचा कथला होऊं लागला आहे. त्यास त्याचा आमचा करिना मनास आणून, गणोजीराव यांचें वतन, त्यांचे पुत्रास व आपण बंधु आपणास दिल्हें पाहिजे म्हणून, विदित केलें. तें स्वामींनीं अंतःकरणांत आणून याची व त्याची मनसुबी करावी; स्थल व गोत लावून यावें; ऐसें करून विठोजीराव व दौलतराव व कान्होजीराव व बहिरजीराव शिर्के यांसी हुजूर आणून, गोतांत राजीनामे द्या व स्थळांत जाऊन व्यवहार सांगा, गोतमुखें न्याय होईल त्याप्रमाणें वतन चालविलें जाईल, ऐसी आज्ञा केली. त्यास विठोजी व वरकड मान्य न होत व राजीनामे न देत. नसती दिक्कत घेऊन कथले करूं लागले. त्याउपरी स्वामींनीं चंदीस सरकारकून होते, त्यामध्यें जे हाजीर आहेत व राजश्री शंकराजी मल्हार, मोंगलाईंतील सैदाचे तर्फेनें आले होते, व राजश्री मानसिंग मोरे व खंडेराव दामाडे सेनापती हे चंदीस, राजश्री काका स्वामीसंनिध होते, त्यास बलावून व राजश्री सुलतानजीराव निंबाळकर, सरलष्कर व वरकड भले लोक व कित्येक परगणीयाचे देशमुख व देशपांडे व मोकदम व शुकसर यांस सभेस बसवून त्यास याचा करिना पुशिला. तेव्हां समस्तांनीं विदित केलें कीं, देवजी शिर्के यांनीं करिना विदित केला, तो यथार्थ आहे. वतन गणोजीराव शिर्के यांसी दिल्हें. रामोजी शिर्के, त्याचे पुतणे म्हणून, त्यांनीं वतनाचीं पत्रें त्यापाशीं देऊन इकडे पाठविलें. तेव्हढीयानेंच रामोजी व त्यांचे भाऊ वतन अनभवूं लागले. वतनाचे खावंद पिलाजी शिर्के हे खरे, ऐसें साक्षपूर्वक विदित केलें. त्यावरून विठोजी व दौलतराव व कान्होजी व बहिरजी शिर्के हे खोटे, ऐसें कळूं आलें. त्यास सदरेवरून उठवून लाविलें. स्वामीस थोरले कैलासवासी स्वामींचें वचन प्रतिपाळावें व कैलासवासी राजश्री काका स्वामींचें दत्त प्रतिपालन करावें हें अगत्य म्हणून, तुम्हांवर स्वामी कृपाळू होऊन, मामले दाभोळचे देशमुखीचें वतन, तुम्हांसच बहाल केलें असे. तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतनाचा उपभोग करून, दंडकप्रमाणें वतनाची सेवा करीत जाणें. या वतनास रामोजी शिर्के यांचें पुत्रास व विठोजी व दौलतराव शिर्के यांस संबंध नाहीं म्हणून." व रायरी मामल्याचें पत्र, राज्याभिषेक शके ४४ हेमलंबिनाम संवत्सरें, राजा शाहू छत्रपती यांचें पिलाजीराव बिन गणोजीराव व देवजीराव बिन पिलाजीराव शिर्के सरदेशमुख, मामले रायरी, यांचें नांवें दिल्हें वतनपत्र ऐसेजे, " तुम्हांमध्यें राजश्री देवजी शिर्के, यांनीं विदित केलें कीं, रायरी मामला, महाल नव येथील सरदेशमुखी शिर्के याची पुरातन, निजामशहा पातशहांनीं दिल्ही होती. ती बहुत दिवस भोगवटा चालिला. त्याजवर आपले वडिलांनीं वतनावर मुतालीक दलपतराव म्हणून पाताणा

परभू ठेवून, आपण पातशाही मनसब दौलत करूं लागले. त्याउपरी जावलीकर चंद्रराव यांनीं रायरी किल्ला घे[illegible] कारकिर्दीस मुतालीक तोच सरदेशमुख म्हणून, वतनाचा भोगवटा करूं लागले. त्यानंतर स्वामींचें राज्य जाहलें, तेव्हां दलपतराव यास कांहीं हक्काची मोईन करून दिल्ही. तेवढ्यावर चाकरी करून वतन अनभवीत आहे. त्याउपरी स्वामी राज्याधिकारी होऊन चंदीस गेले. तिकडे मोंगलांच्या फौजा नामजाद जाहल्या. चंदीस वेढा झुलपिकारखानानें घातला. ते समयीं गणोजीराव व त्यांचे पुतणे, रामोजी शिर्के मोंगलाईंत होते. त्यास कौल देऊन चंदीस आणिलें. दौलतेचा सरंजाम करून चालवीत होते. त्या प्रसंगीं वतनदारांचीं पुरातन वतनें, ज्यांचीं त्यांस दिल्हीं. व कित्येकांस नवीं करून दिल्हीं. ते समयीं गणोजीराव व रामोजीराव यांनीं रायरी मामलेयाची सरदेशमुखी पुरातन आपली, आपणास द्यावी, मुतालीक दूर करावा, ह्मणून विनंति केली. ते प्रसंगीं आप्पाजी दलपतराव, मुतालीक चंदीस आला होता. त्याजला स्वामींनीं शपथ घालून कारिना पुशिला, तेव्हां तो आपण मुतालीक म्हणोन कबूल झाला. त्याजवरून शिर्के सरदेशमुख ऐसें खरें झालें. तो मुतालीक दूर करून, सरदेशमुखीचें वतन, गणोजीराव व रामोजीराव शिर्के यांसी करार करून देऊन, तानाजीराव वडील भाऊ त्याचे कान्होजी, त्याचे रामोजी यास्तव त्याचें नांव आधीं लेहून, पिलाजीराव धाकटे भाऊ त्याचे पुत्र, गणोजीराव म्हणून त्याचें नांव मागून लेहून राजपत्रें करून दिल्हीं. त्याउपरीं राजश्री स्वामी देशास आले. समागमें रामोजी शिर्के पत्रें घेऊन आले. त्यांनीं नवीन ताकीदपत्रें मागितलीं. त्यांत गैरवांका समजावून, आपलें एकाचेंच नांवें पत्रें घेऊन, वतनाचा अनुभव करूं लागले. आपला विभाग द्यावयासी कथला करितात. येविषयीं मनास आणून, पारपत्य केलें पाहिजे, म्हणून त्याजवरून विठोजी व दौलतराव व कान्होजी व बहिरजी शिर्के यांसी हुजूर आणून, जामीन देऊन मनसुबीस उभें राहणें; निवाडा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करणें म्हणून आज्ञा केली. त्यास तुम्हीं राजीनामा द्यावयासी सिद्ध जाहले. ते चौघेजण राजीनामा देत नवते. कथले करूं लागले. यास्तव त्यास सदरेवरून उठविलें. आणि सभासद हुजूरचे सरकारकून व शंकराजी मल्हार पूर्वीं चंदीस होते ते, मोगलाईंतून स्वामीसन्निध आले. त्यास व राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति व मानसिंग मोरे व सुलतानजीराव निंबाळकर व वरकड भले लोक यांसी कारिना पुशिला. त्यांनीं चंदीचे प्रसंगीं गणोजीराव शिर्के यांनीं स्वामींसेवा करून कार्यास आले. याकरितां हें वतन त्यांस दिल्हें. उभयतां शिर्के यांचें आहे. येविषयीं विदित केलें. त्याप्रमाणें विठोजी व दौलतराव व कान्होजी व बहिरजी शिर्के यांसी मान्य करून, वतन अनभविणें म्हणून आज्ञा केली. परंतु ते मान्य न होत. यास्तव स्वामी तुम्हांवर कृपाळू होऊन, तुह्मांस मामले मजकूरचें वतन बहाल केलें असे. तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभव करून सुखरूप राहणें ह्मणून. यावरून पंचाईतमतें मनास आणितां तुमचा व लक्ष्मणराव शिर्के यांचा मामले रायरी शिरकाण, येथील सरदेशमुखीचा

कजिआ लागोन मनसुबी हुजूर पडली. त्याची चवकशी करून, पेशजी साल तिगस्तां सन इहिदे समानीनचे सालीं, रायरी मामल्याचे सरदेशमुखीचे वतनाचा निमें विभाग तुम्हीं घ्यावा या अन्वयें निवाडपत्रें तुमचें नांवें तयार झालीं. त्याजवर शिक्के व्हावे तों, ईंग्रज बोरघाटाने माथां आला. पुण्यांत गडबड जाहली. यास्तव, नजरेचे ऐवजाचा भरणा न होय. सबब ऐवजाचे तरतुदीकरितां निवाड्याची यादी घेऊन, तुह्मी नागपूर प्रांतीं गेलां. ही संधी पाहून, तुह्मी गैरहाजीर झाल्यामुळें पुन्हा चवकशी जाहली पाहिजे म्हणून, लक्ष्मणराव शिर्के यांनीं विनंति करून, आठ हजार रुपये सरकारांत नजर देऊन, रायरी मामल्याचे सरदेशमुखीचे वतन, दरोबस्त आपल्याकडे चालतें करावयाविषयीं पत्रें तयार करविलीं. त्याजवर शिक्के व्हावे तों तुम्हीं नजरेचे ऐवजासुद्धां हाजर होऊन, त्याचे पत्रावर शिक्के न व्हावे, याविषयीं अडथळा करून विनंति केली कीं, पेशजीचे कराराप्रमाणें सरकारचे नजरेचा ऐवज सरकारांत घेऊन, रायरी मामल्याचे सरदेशमुखीचे निमे विभागाविषयीं, आमचें नांवें पत्रें तयार जाहलीं आहेत, त्याजवर शिक्के करून द्यावे म्हणून. त्यास कैलासवासी शाहू महाराजांचे वेळेस, कान्होजी शिर्के यांनीं सदरहू दोन्हीं वतनाचें वडीलपण शिक्का आपला म्हणून श्रीकृष्णोचें दिव्य करून राजपत्रें घेतलीं होतीं, तें गळाठली. यास्तव सातारीयाचें दफ्तरचे बार लेहून आणवून, भिकाजीराव शिर्के यांसीं, निवाड्याची यादी करून दिल्ही आहे. त्याची पुन्हा पुर्ती चवकशी करावी म्हणून लक्ष्मणराव शिर्के यांनीं आक्षेप केला. त्याजवरून कृष्णराव अनंत, किल्ले सातारा यांसी पत्रें लिहिलीं. त्यांनीं तेथील मजमू दफ्तरीं शोध करून, दाहा पत्रें बार जाहलीयाची यादी पाठविली. त्यांची व दोन्हीं वतनास विठोजी व दौलतराव व कान्होजी व बहिरजीराव शिर्के यांसी संबंध नाहीं. सदरहू दोन्हीं वतनें पिलाजीराव बिन गणोजीराव व देवजीराव बिन पिलाजीराव शिर्के यांनीं अनभवावीं म्हणून, गोत महजरापूर्वील राजपत्रें तुह्मांपाशीं आहेत, त्याची चवकशी करितां एकले गणोजीराव शिर्के यांसच दाभोळ सुभ्याचे देशमुखीचें वतन दिल्हें, व मामले रायरी शिरकाण, येथील सरदेशमुखीचें वतन गणोजीराव शिर्के याचे भिडेवरून, रामोजीराव शिर्के यांस महाराजांनीं आपणाजवळ ठेऊन घेऊन, वतनावर पाताणा परभू मुतालीक होता त्यास दूर करून, गणोजीराव व रामोजीराव या उभयतांचें नांवें, रायरी मामल्याचे सरदेशमुखीचे वतनाचीं पत्रें करून दिल्हीं. त्या पत्रांचा लोप रामोजीराव यांनीं करून, दुसरीं पत्रें आपल्या साधकांचीं घेतलीं. आणि दोन्ही वतनें आपणच अनभवूं लागले. वतनाचे कष्ट, मेहेनत, जीवाभ्यश्रम, साहस गणोजीराव शिर्के यांणींच केले. म्हणून चंदीचे साक्षींत गोत महजरा पूर्वीच पुरलें. त्यासमयीं विठोजी व दौलतराव व कान्होजीराव व बहिरजीराव शिर्के यांसी महाराजांनीं हुजूर आणून, मनसुबीस राजी होऊन राजीनामे देणें, म्हणून आज्ञा केली. ते जामीन न देत व मनसुबीस उभे न राहत. यास्तव दोन्हीं वतनांस त्यांजला संबंध नाहीं. तुमचे वडिलीं दोन्हीं वतनें अनभवावीं. येविषयीं राजपत्रें झालींच आहेत. त्याजउपरीं पुनः महाराजांपाशीं उभयतां वादीयांचा फिरोन कजिया पडिला. यास्तव पुन्हां चंदीचे साक्ष मोझे मनास आणून, महाराजांनीं गोत महजर लिख्यानिशी करून दिल्हा. त्याच अन्वयें कान्होजीराव शिर्के, यांनी सनद पत्र लेहून दिल्हें व मातुश्री ताराऊसाहेब यांनीं चंदीचे माहितगारीनें मनास आणून, शपथ पुरस्कर निवाडपत्र करून दिल्हें. एकूण

तिन्ही पत्रे यथान्याये झाली असता, फिरोन कजिया उपस्थित करोन, कान्होजी शिर्के यानी श्रीकृष्णेचे दिव्य केले. त्याचा विचार पाहता, उभयता वादी याचा मूळपुरुष वाघोजी शिर्के त्यास पुत्र तानाजीराव, पिलाजीराव एकूण दोघे. पैकी वडील तानाजी यासी पुत्र कान्होजी, त्याचे रामोजी, त्याचे कान्होजी, त्याचे हल्ली लक्ष्मणराव, व धाकटे पिलाजी. त्यास पुत्र देवजीराजे शिर्के त्याचे हल्ली तुह्मी एका मूळपुरुषाचा वंश असता, मामले रायरी शिरकाण, येथील सरदेशमुखीचे वतनाचे वडीलपण शिक्का आपला ऐसे देवजी शिर्के ह्मणत नसता व वडीलपणे आह्मी देऊं ते देवजीराव शिर्के यानी घ्यावे, ऐसे कान्होजीराव शिर्के याचे बोलणे असता, वडीलपण शिक्का आपला ह्मणून, श्रीकृष्णेचे दिव्य कान्होजीराव यानी केले. त्यास कान्होजीराव याचे घराणे वडील असता, वडीलपण शिक्का आपला ह्मणून दिव्य केले' ते दिव्य विरुद्ध कैसे पटेल ? व दिव्याचे उच्चारात देवजी शिर्के यासी वतनास संबंध नाही असे असते तरी दिव्य लागते ते गोष्ट काहीच नाही. तेव्हा वडील असता वडीलपणाचे दिव्य केल्यामुळे, देवजी शिर्के यासी वतनास संबंध नाही, ऐसे कैसे घडेल ? वडिलोपार्जित वृत्तीचे जीर्णोद्धाराविषयी कोणत्याही भावाबद्दानी टका, पैका खर्च करून मेहनत केली असली, तथापि वरकड भावापासून, तक्षिमेप्रमाणे खर्चाचा ऐवज घेऊन, त्याचा विभाग त्यास द्यावा असे असता, कष्ट, मेहनत एकले रामोजीराव शिर्के यानीच केली ऐसेही नाही. राज्यात मातबरी गणोजी राजे याची त्याचे भिडेवरून व त्यानी चवीचे समयी जीवाभ्य मेहनत, श्रम, साहस केल्यामुळे दोन्ही वतने साध्य केली ऐसे चवीचे साक्ष मोठे महाराजानी पाहिले असता, त्याविषयी दिव्य करणे व करवणे योग्य नहे हाच अर्थ महाराजानी समजोन, पुढे दोन वर्षांनी, तुळाजी आंग्रे सरखेल यासी हातरोखा, सौभाग्यवती सकवारबाईसाहेब याने अग्रहारतव, दिव्यपत्राचे अन्वये सिद्ध जाहला त्या हातरोख्याचे शेवटी महाराजानी स्वदस्तुरे लिहिले आहे की, यासी पूर्वी राजश्री—याही पत्रे वतनाची दिल्ही आहेत. त्याप्रमाणे आम्ही दिल्ही आहेत. त्याप्रमाणे तुह्मी चालवणे उजूर न करणे म्हणून लिहिले आहे तेव्हा दिव्य भिडेमुळे जाहले असे, तेच समयी महाराजाचे ध्यानात येऊन पूर्वील पत्राप्रमाणे चालवणे म्हणून लिहिले आहे व या दिव्याचा विचार साल तिगस्ता तुमचे नावे निवाडपत्र दिल्हें आहे, त्या निवाडपत्री सर्व मजकूर उगवलाच आहे तथापि हल्ली चवकशी करिता, पेशजी दिव्य होऊन राजपत्रे जाहली त्याजवर शिक्केही जाहले तथापि दिव्याच्या मजकुरामुळे तुम्हास विभाग न यावा असे होत नाही याप्रमाणे सिद्ध जाहले यास्तव पुन्हा चवकशी करावी म्हणून, लक्ष्मणराव शिर्के यानी विनंति करून, आठ हजार रुपये सरकारात नजर देऊन, रायरी मामल्याचे सरदेशमुखीचे दरोबस्त वतन आपल्याकडे चालते करावयाविषयी पत्राची यादी करून घेऊन, त्याप्रमाणे पत्रे तयार करविली. त्याजवर शिक्के व्हावयाचे राहिले आहेत ती पत्रे व यादी रद्द करून, यावरून कान्होजी शिर्के यानी, सौभाग्यवती सकवारबाईसाहेबाचेही माहितीने आग्रहामुळे दिव्य केलेसे करून, दोन्ही वतनास देवजीराव शिर्के यासी संबंध नाही ह्मणून राजपत्रे घेतली. त्यावरून दोन्ही वतनाचे धनी, लक्ष्मणराव शिर्के होतात, असे घडत नाही. व गोत महजरा पूर्वी, रामोजी शिर्के यांनी पूर्वील पत्राचा लोप करून, लोभास प्रवर्तून, आपले साध-

कांहीं दुसरीं पत्रें घेतलीं. ऐसे चंदीचे साक्षी मोझे पुरले. यामुळें विठोजीराव व दौलतराव व बहिरजीराव व कान्होजीराव शिर्के, इनसाफास उमे न राहत. सबब दोन्हीं वतनांसी त्यांस संबंध नाहीं म्हणून राजपत्रें तुम्हांजवळ आहेत, यावरून दोन्हीं वतनें तुमचींच कशीं होतील ? पूर्वी शाहूमहाराज यांनीं सरकारकून व मुत्सदी व जमीदार मिळवून, बावन्न असामी यांचे विद्यमानें, चंदीचे साक्षी मोझे मनास आणून, मामले रायरी शिरकाण येथील सरदेशमुखीचें वतन वडिलांचें. तेथील वडीलपण शिक्का, मानपान, तश्रीफ, आर्धी कान्होजीराव बिन रामोजीराव शिर्के यांनीं घ्यावी; व सुभा दाभोळ येथील देशमुखीचें वतन अजरामऱ्हामत राणोजीराव यांचें नांवें, वास्तव तेथील वडीलपण, शिक्का, मानपान, तश्रीफ, आर्धी पिलाजीराव बिन राणोजीराव यांनीं घ्यावी. त्यांचे मागून मानपान तश्रीफ कान्होजीराव बिन रामोजीराव यांनीं घ्यावी व दोही वतनाचें उत्पन्न निमेंनिम प्रमाणें दोघांनीं वांटून घ्यावें. म्हणून गोत महजर शिक्यानिशीं, शके १६४० विलंबीनाम संवत्सरीं करून दिल्हा. त्याअन्वयें राजपत्रें जाहलीं. व सदरहू महजराचे अन्वयें वंशपरंपरेनें चालावयाविषयीं तळेगांवचे मुक्कामीं, खंडेराव दाभाडे सेनापति व मातबर सरदार, यांचे विद्यमानें कान्होजीराव शिर्के यांनीं देवजीराव शिर्के यांचें नांवें प्लवंगनाम संवत्सरीं, श्री सिर्काईची व काशींत महापातकें केल्याचें शपथपूर्वक पत्र लेहून दिल्हें असें असतां, फिरोन कजिया करूं लागले. तेव्हां शाहूमहाराज यांनीं शिर्केयांसी पूर्वील साहेबांचें देणें आहे, यानिमित्यें सत्य, सुकृत व थोरले महाराजांची शपथ व गंगा स्मरोन निवाडा करावा म्हणून, कैलासवासी ताराऊसाहेब यांसी विनंति करून, गंगोदकाच्या व श्री बाळकृष्ण देवाच्या तुळसी व यादवभट उपाध्ये व रघोजी भोंसले व राणोजी भोंसले व कित्येक मातबर सरदार, यांबरोबर उभयतां शिर्के यांसी देऊन, त्यांजकडे पाठविले. त्यांनीं मागील माहितगारीनें इनसाफाची छान करून, महजराचे अन्वयें सर्वांचे विद्यमानें निवाडा करून, देवजी शिर्के यांचें नांवें, दुर्मतीनाम संवत्सरीं निवाडपत्र करून दिल्हें. एकूण तिन्हीं पत्रें विचार होऊन, न्याय शुद्ध झाला. त्याअन्वयें करून हल्लीं हें पत्र दिल्हें असे. तरी सन इहिदेचे सालीं, पंचाईतमतें निवाडा होऊन, तुमचे नांवें निवाडपत्रें करून दिल्हीं, तीं यथार्थ आहेत. त्याजवर तुम्हीं शिक्के करून घेऊन, त्याप्रमाणें तुम्हीं व त्यांनीं चालावें. त्या पत्रांत वरकड विभागाचा मजकूर सर्व यथास्थितच उगवला आहे. परंतु गोत महजरीं, मामले रायरी शिरकाण, येथील सरदेशमुखीचें वतनाचें वडीलपण, शिक्का मात्र लक्ष्मणराव शिर्के यांचे वडिलांकडे, याप्रमाणें ठरलें असतां, शिक्यासंबंधीं उत्पन्न, नक्त व वस्तें दरोबस्त लक्ष्मणराव शिर्के यांजकडे; वरकड उत्पन्नापैकीं निमें तुम्हांकडे ऐसें लिहिलें आहे. तें निवाडपत्रीं समजोन लिहिलें नाहीं. यास्तव पेशजी कैलासवासी शाहूमहाराज यांनीं गोत महजरीं ठराव केला आहे, त्याप्रमाणें मामले रायरी शिरकाण येथील वडीलपण शिक्का मात्र, लक्ष्मणराव शिर्के यांजकडे; वरकड दरोबस्त वतनसंबंधीं उत्पन्न निमें त्यांजकडे व निमें तुम्हांकडे याप्रमाणें ठराव केला आहे. त्याप्रमाणें तुम्हीं आपला विभाग अनभवीत जावा. सुभा दाभोळ येथील देशमुखीचें वतनाचा कजिया आहे, त्याचा विचार पेस्तर मनास आणून, आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करणें.